# अनुक्रमणिका

# जीवनचरित्र

सुमारे साडेपाचशे वर्षांपूर्वीची ही कहाणी आहे. काशीजवळील लहरतारा येथे नीरू नामक कोष्टी आणि त्याची पत्नी नीमा यांना एक नवजात बालक टाकून दिलेल्या स्थितीत सापडले. असे सांगतात की, नीरू विवाहानंतर त्या दिवशी प्रथमच नीमास आपल्या घरी घेऊन चालला होता. अशा एकाकी पडलेल्या त्या नवजात शिशूस पाहून ही नवविवाहित पतिपत्नी मोठ्याच धर्मसंकटात सापडली. मूल इतके गोड होते की त्याला तसेच सोडून देणे त्यांना शक्य होईना; आणि इकडे तर भीती वाटत होती की लोक काय म्हणतील? दोघा पतिपत्नींनी बराच विचार केला. नीरूला आपली चारचौघांत बदनामी होईल अशी भीती वाटत होती; तर नीमाचे हृदय त्या बालकाविषयीच्या वात्सल्याने भरून गेले होते. बराच खल करून शेवटी लोक काय म्हणतील त्याचा विचार करायचा नाही असे ठरवून त्या दोघांनी त्या नवजात बालकास घेऊनच जायचे असे ठरविले. आमच्या चरित्रनायकाच्या नावाने काशी येथे आजही जो मोहल्ला 'कबीर चौरा' या नावाने सुप्रसिद्ध आहे, याच ठिकाणी नीरूचे घर दाखविले जाते. या जागेस आजही 'नीरू तल्ला' असे म्हणतात. आपल्या घरी आल्यानंतर रीतिरिवाजाप्रमाणे बाळाचे नाव ठेवण्यास त्यांनी कोणा एका काजीस बोलाविले. असे सांगतात की, त्याने जेव्हा कुराण उघडले तेव्हा त्याला प्रत्येक ओळीवर कबीर, कुब्रा, अकबर इत्यादी शब्दच दिसू लागले. अरबी भाषेत हे सर्व महान परमात्मा अशा अर्थाने प्रयुक्त होतात. काजी मोठ्या पेचात पडला की, या सामान्य कोष्ट्याच्या घरच्या पोरास परमेश्वराचे नाव कसे ठेवायचे? आपल्याला भ्रम तर होत नाही ना, असे म्हणून त्याने पुनःपुन्हा कुराण पाहिले. परंतु दुसऱ्यांदा, तिसऱ्यांदाही त्याला तेच शब्द दिसू लागले. ही वार्ता ऐकून आणखी काही काजी तेथे गोळा झाले. परंतु, त्यांनीही वारंवार धर्मग्रंथ उघडून पाहिल्यानंतर ईश्वराचीच नावे आढळून येऊ लागली. शेवटी, सर्व काजींनी त्रस्त होऊन नीरू कोष्ट्याला असा सल्ला दिला की त्याने या पोरास कापून टाकावे, अन्यथा या पोरामुळे त्याचे अहित होणे टळणार नाही. असे म्हणतात की, धर्मपंडितांची आज्ञा शिरसावंद्य मानून नीरूने बालकावर तलवारीचा घाव केला. परंतु त्या वाराचा त्यावर काहीही परिणाम झाला नाही. अनेकांचा या घटनेवर विश्वास बसणार नाही. परंतु असे निश्चितपणे मानता येईल की, नीरू आणि नीमा यांना धर्मपंडितांची आज्ञा आवडली नसावी. बालकास मारून टाका असे सांगितल्यावर

त्या दोघांच्या मनात बाळाविषयी किती स्नेह दाटून आला असेल याची कल्पना केलेली बरी. काहीही असो, सध्या या बालकाचे नाव कबीर असे ठाऊक आहे, आणि ज्याच्या खऱ्या आईबापांची नावेसुद्धा आजवर ठाऊक झाली नाहीत असा हा बालक पुढे भारताचा एक थोर संत म्हणून प्रसिद्धी पावला. त्याने आपल्या महान सिद्धान्तांनी केवळ या देशातील लोकांनाच नव्हे तर दूरवरच्या देशांतीलही अगणित जनांना सत्य, त्याग, निःस्पृहता आणि निर्भयता यांची प्रेरणा प्रदान केली.

कबीरांचा जन्म निश्चित कोणत्या वर्षी आणि कोणत्या तारखेस झाला, याविषयी ठामपणाने काही सांगणे फार कठीण आहे. त्यांच्या जन्मतिथीसंबंधीचे एक कथन अनेक दिवसांपासून प्रचारात आहे. परंतु ज्याप्रमाणे प्रत्यक्ष कबीरांस जन्म देणाऱ्या आईबापांची काही निश्चितपणाने ठाऊक नाही, त्याचप्रमाणे या कथनाचा कर्ता कोण हेही पक्के ठाऊक नाही; आणि हे कथन नेमके केव्हापासून प्रचलित आहे तेही सांगता येत नाही. ते कथन असे -

**चौदह सौ पचपन साल गए,**
**चंद्रवार इक ठाठ ठए ।**
**जेठ सुदी बरसायत को,**
**पूरनमासी प्रगट भए ॥**

अर्थात, विक्रमसंवताची १४५५ वर्षे उलटून गेल्यानंतर सोमवारी ज्येष्ठ पौर्णिमेच्या अर्थात वटसावित्रीच्या सणाच्या दिवशी कबीरांचा अवतार झाला होता. आजही वटसावित्रीच्या दिवशीच कबीरपंथाचे अनुयायी त्यांचा जन्मोत्सव साजरा करीत असतात. काही अभ्यासकांनी संशोधन करून असे निश्चित केले की, सोमवारी येणारी ज्येष्ठ पौर्णिमा संवत १४५५ मध्ये असणार नाही; अशी पौर्णिमा संवत १४५६ मध्ये येऊ शकते; म्हणून 'चौदह सौ पचपन साल गये' चा अर्थ असाही असू शकेल की १४५५ वे वर्ष समाप्त झाल्यानंतर संवत १४५६ मध्ये त्यांचा जन्म झाला. परंतु खरे पाहता, या संशोधकांचे हे म्हणणे पटण्यासारखे नाही. कारण, संवत १४५५ मधील ज्येष्ठातील पौर्णिमा सोमवारीच येते. त्याचप्रमाणे येथे हेही नमूद केले पाहिजे की, कबीरांच्या जीवनातील काही प्रसंगांचा अर्थ लावण्याच्या दृष्टीने काही लोक त्यांचा जन्म पंचवीस-तीस वर्षे आधीचाही मानून चालतात. त्यांची ही अटकळ खरीही असू शकेल किंवा खोटीही असण्याची शक्यता आहे.

लहरतारा येथे जो प्रसंग घडला त्यास अनुसरून अनेक दंतकथा प्रसृत झाल्या आहेत. एक गोष्ट अशी सांगतात - एके दिवशी एक ब्राह्मण आपल्या विधवा कन्येस बरोबर घेऊन स्वामी रामानंद यांचे दर्शन घेण्यासाठी गेला. आपल्या वडिलांच्या बरोबर जेव्हा त्या कन्येनेही स्वामीजींना वंदन केले तेव्हा एकदम स्वामीजींच्या तोंडून आशीर्वाद मिळून गेला : "पुत्रवती भव!" महात्म्याने दिलेला आशीर्वाद खोटा ठरू शकत नाही. म्हणून

काही दिवस निघून गेल्यानंतर त्या विधवेच्या पोटी गर्भ राहिला. आणि अशा प्रकारे जो पुत्र जन्मास आला त्यास लोकलज्जेच्या भयाने तिने लहरतारा येथील तलावात फेकून दिले. काही लोक या गोष्टीस आणखीही काही चमत्काराचा भाग जोडून टाकतात. त्यांचे म्हणणे असे की, जेव्हा स्वामी रामानंदांना हे ठाऊक झाले की आपण आशीर्वाद दिला ती ब्राह्मणकन्या विधवा आहे, तेव्हा त्यांनी तिला म्हटले, "मुली, माझे बोल तर खोटे ठरणार नाहीत. परंतु तुला काळिमाही लागणार नाही. आणि तुझा मुलगा मोठा संतपुरुष म्हणून प्रसिद्धीस येईल." असे म्हणतात की, या घटनेनंतर लगेच त्या मुलीच्या हातावर कातडे भाजल्यावर जसा फोड येतो तसा मोठा फोड आला. काही दिवसांनी हा फोड फुटला आणि त्यातून एक गुबगुबीत जीव बाहेर पडला. तो जमिनीवर पडताच माणसासारखा झाला. या दंतकथेप्रमाणे कबीरांचे खरे नाव 'करवीर' म्हणजे हातापासून उत्पन्न झालेला वीर पुरुष असे मानण्यात येते. कबीर कोणाच्या पोटी जन्माला आले नव्हते आणि ते अयोनिज होते हे सिद्ध करावे, एवढाच उद्देश या कथेचा प्रसार करण्यामागे असावा.

दुसरी एक गोष्ट तर अधिकच मौजेची आहे. या गोष्टीप्रमाणे, एकदा भगवान विष्णू लक्ष्मीशी गप्पा मारीत आपल्या वैकुंठलोकी बसलेले होते. त्यावेळी मध्येच एकदा उठून ते बाहेर गेले आणि थोड्याच वेळात फिरून परत आले. बोलण्यात खंड पडला म्हणून लक्ष्मी जरा रुष्ट झाली आणि तिने भगवान विष्णूंना असे मध्येच उठून जाण्यासारखे काय झाले म्हणून पृच्छा केली. विष्णुदेवांनी उत्तर दिले की, त्यांचा एक भक्त संकटात सापडला होता, त्याला वाचविण्यासाठी त्यांना असे मधूनच उठून जाणे भाग पडले. यामुळे लक्ष्मीस मोठे आश्चर्य वाटून ती म्हणाली, "असा माझ्यापेक्षाही मोठा तो कोण भक्त आहे की ज्याच्यासाठी परमेश्वर इतका कष्टी झाला?" यावर भगवान विष्णूंनी लक्ष्मीस उत्तर दिले की, तिच्याहूनही थोर असे त्यांचे भक्त या जगात आहेत; आणि त्यांच्या उद्धारासाठी स्वतःची सारी कामे सोडून ते जात असतात. हे ऐकून लक्ष्मीस मोठे वैषम्य वाटल्यावाचून राहिले नाही. तिने त्या भक्ताची परीक्षा पाहावयाचे ठरविले. विष्णूंनी तिला परोपरीने समजावून सांगितले पण तिने त्यांचे ऐकले नाही. काशीनगरीस येऊन एका माळणीचे रूप घेऊन ती राहू लागली. ज्या मार्गाने ते भक्त (म्हणजे स्वामी रामानंद) गंगास्नानासाठी रोज जात असत त्याच मार्गावर तिने एक सुंदरशी बाग सजविली. ईश्वरपूजेसाठी चार फुले तोडून घ्यावी म्हणून स्वामी रामानंद त्या बागेत आले आणि त्यांनी दोन फुले तोडली; तोच माळणीचे रूप धारण केलेली लक्ष्मी त्यांच्यासमोर येऊन उभी राहिली, आणि तिने त्यांना म्हटले, "महाराज! आपण फुलांची चोरी करत आहात!" स्वामीजींनी तोडलेली ती फुले माळणीच्या पदरात फेकून दिली आणि ते आपल्या मार्गाने चालू लागले. परंतु थोड्या वेळाने सहज म्हणून मागे वळून पाहतात तो काय चमत्कार! तेथे बागही नव्हती आणि माळीणही नव्हती. इकडे भक्ताला चोरी करताना पकडले म्हणून लक्ष्मीला खूप आनंद होत होता. ती जेव्हा पुन्हा वैकुंठाला पोहोचली तेव्हा विष्णू

भगवानांनी तिचे स्वागत केले आणि तिने घेतलेल्या भक्त-परीक्षेसंबंधी प्रश्न विचारला. चोरी पकडून मिळविलेली फुले दाखविण्यासाठी तिने आपला पदर पसरला. तो काय आश्चर्य! फुलांच्या ठिकाणी एक सुंदर लहान मूल खेळते आहे! भगवान विष्णूंनी हीच योग्य वेळ आहे असे पाहून तिची चेष्टा केली - "तुम्ही तर गेला होता भक्ताची परीक्षा पाहायला! आणि हे हो काय घेऊन आलात?" लक्ष्मी लज्जेने चूर होऊन गेली. तिने भगवंतांपुढे भक्ताने आपला पराभव केल्याचे मान्य केले आणि ती क्षमेची याचना करू लागली. विष्णूंनी तिला धीर देऊन सांगितले, "असू दे. आता जे झाले ते झाले. आता तू या बाळाला जेथून घेऊन आलीस तेथेच त्याला ठेवून ये. पुढे हा माझा मोठा भक्त म्हणून प्रसिद्धीस येईल." लक्ष्मीने त्या बालकाला लहरतारा नावाच्या तलावातील कमलपत्रावर आणून ठेवून दिले. हाच बालक कबीर या नावाने प्रसिद्धी पावला.

तिसऱ्या एका कथेप्रमाणे कबीर हे शुकदेवाचे अवतार समजले जातात. असे म्हणतात की, शंभुमहादेवाच्या आज्ञेस मानून शुकदेव एकदा लोककल्याण करावे म्हणून भूलोकी आले. परंतु पूर्वजन्मी त्यांनी बारा वर्षे गर्भवासाचे दुःख भोगलेले होते म्हणून यावेळी गर्भवासापासून सुटका करून घेण्यासाठी त्यांनी आपणास एका शिंपल्यामध्ये बंद करून घेतले, आणि तो शिंपला त्यांनी भागीरथीच्या प्रवाहात सोडून दिला. हा शिंपला वाहत वाहत एके दिवशी वर उल्लेखिलेल्या तलावात येऊन पोहोचला, आणि दैवयोगाने येथेच एका कमळाच्या पानावर येऊन उघडला गेला. त्यातून एक सुंदर बाळ प्रकट झाले. हेच पुढे कबीर या नावाने प्रसिद्धीस आले.

असे वाटते की, वर दिलेल्या सर्व दंतकथा कबीरदासांच्या मृत्यूनंतर बऱ्याच दिवसांनी प्रचारात आल्या असाव्यात; कारण पुराणांतील कथांप्रमाणे या कथांत कल्पनाविलासाचा भाग जरा अधिकच आढळून येतो. लक्ष्मी आणि शुकदेव यांच्यासंबंधीच्या गोष्टी तर निश्चितपणे पुराणांतील कथांप्रमाणे आहेत. पहिल्या कथेत सत्याचा थोडाफार अंश असेल असे मानावयास हरकत नाही. परंतु कबीरपंथाचे लोक यांपैकी कोणत्याच कथेवर विश्वास ठेवीत नाहीत. त्यांचे म्हणणे असे आहे की, कबीरदास कोणाच्याच पोटी जन्मास आलेले नाहीत. तो महान सत्पुरुष परमेश्वराचा अंशच आहे. तो कधी जन्म घेत नाही, किंवा कधी मृत्यूही पावत नाही. जेव्हा जेव्हा आवश्यकता उत्पन्न होते तेव्हा तो महापुरुष अचानकपणे प्रकट होत असतो. ते असे मानतात की, पहिल्या तीन युगांमध्ये कबीरदासांचे एकूण तेरा अवतार झाले आहेत. कलियुगात चौदाव्या वेळी विक्रम संवत १४५५ च्या ज्येष्ठ पौर्णिमेच्या दिवशी त्या सत्पुरुषाचा दिव्य प्रकाश पुनश्च काशी शहराच्या लहरतारा भागाजवळ प्रकट झाला. त्यावेळी त्या तलावाशेजारी अष्टानंद वैष्णव उपस्थित होते. रिमझिम पाऊस पडत होता. आकाशात काही ढग आलेले होते, आणि त्या किंचित अंधारलेल्या वेळी वीजही चमकून जात होती. पुष्पे फुललेली होती. त्यांवर भ्रमरांचा गुंजारव सुरू होता! त्या अनुपमेय ज्योतिःपुंजाचे दर्शन झाल्यावर अष्टानंदांना मोठे आश्चर्य वाटले. त्यांनी या घटनेचे संपूर्ण वर्णन आपले गुरू स्वामी रामानंद यांच्यापाशी

येऊन सांगितले. यावर स्वामीजींनी त्यांना सांगितले की, ज्या दिव्य ज्योतीचे दर्शन तुला घडले आहे तिच्याविषयी लवकरच तुला आणखी खूपशा गोष्टी ऐकायला मिळतील, आणि त्या ज्योतीची कीर्ती सर्वत्र दरवळू लागेल. ती दिव्य ज्योती तलावात आल्यावर एका बालकाच्या रूपातच परावर्तित झाली आणि एका कमलपुष्पावर विराजित होऊन बालसुलभ क्रीडा करू लागली. नीमाला याच दिव्य बालकाचे दर्शन घडले होते.

कबीरपंथांत प्रचलित असलेल्या ग्रंथांवरून अशीही माहिती मिळते की, नीरू आणि नीमा ही आपल्या पूर्वजन्मामध्ये सुदर्शन नावाच्या एका भंग्याची माता-पिता होती. सुदर्शन मोठा भक्त होता. म्हणून आईबापही आपल्या पुढल्या जन्मी भंग्याचा देह सोडून ब्राह्मण जातीत जन्मास आले. पुढे विवाहित होऊन चंदवार नावाच्या शहरी राहू लागले. त्यावेळी यांची नावे नरहरी आणि लछिमा अशी होती. यांच्यावरील स्नेहामुळे कबीरदास यांच्याच घरी पुनश्च अवतरित झाले. परंतु मायेच्या पसाऱ्यामुळे जेव्हा त्यांनी कबीरदासांस ओळखले नाही तेव्हा कबीरदास तेथून गुप्त झाले. पुढे त्यांच्या वियोगाचे दुःख असह्य होऊन त्यांनी शरीरत्याग केला आणि काशी येथे पुन्हा तिसऱ्या वेळी कोष्टी आणि कोष्टिणीच्या रूपात प्रकट झाले. त्यांचीच नावे नीरू आणि नीमा अशी होती. पुढची सर्व कथा मागे कथन केल्याप्रमाणेच आहे. केवळ एवढाच भाग त्या कथेत अधिक जोडण्यात आला आहे की – नामकरणाच्या वेळी काजीने नीरूस "मूल मारून टाक" अशी आज्ञा दिली आणि ती आज्ञा प्रमाण मानून जेव्हा नीरूने मुलावर सुरी चालविली तेव्हा कबीरदासांनी हे पद म्हणून दाखविले -

**संतो मैं अविगत सौं चलि आया ।**
**मेरा मरम किनहूं नहिं पाया ।।**
**ना मेरे जनम न गरभ बसेरा; बालक ह्वै दिखलाया ।**
**कासीपुरी जंगल बिच डेरा, तहां जुलाहे पाया ।।१।।**
**ना मेरे धरनि गगन पुनि, नाहीं ऐसा अगम अपारा ।**
**जोति सरूप निरंजन देवा, सा है नांव हमारा ।।२।।**
**हता बिदेह देह धरि आया, काया कबीर कहाया ।**
**पिछले जनम में कौल किया था, तब तेरे घर आया ।।३।।**
**ना मेरे हाड़ चाम नहिं, लोहू एकै नांव उपासी ।**
**तारन तरन अभय पद दाता, कहै कबीर अविनासी ।।४।**

या पदामध्ये जी पूर्वजन्माविषयीची चर्चा आलेली आहे, त्यासंबंधी पूर्वीच सांगितले आहे. यापूर्वीही सत्ययुग, त्रेतायुग आणि द्वापर युगांत कबीरदास क्रमशः सतसुकृत, मुनींद्र आणि करुणामय या नावांनी प्रकट झालेले होते, अशी कबीरपंथीय साधूंची श्रद्धा आहे. श्रद्धा आणि विश्वास यांबद्दलच बोलायचे झाले, तर येथे त्याविरुद्ध काही

अधिक सांगणे प्रशस्त होणार नाही. कारण श्रद्धेने अनेक मोठमोठ्या गोष्टीही साकार होतात. परंतु हेही सांगणे आवश्यक आहे की, श्रद्धा अंधस्वरूपाची नसावी. अंधश्रद्धा आपणांस दिशा भ्रष्टही करून टाकू शकते. वास्तविक पाहता, सामान्य जनांसही या सर्व कथांतून अशा अनेक गोष्टी मिळतील की ज्यांच्यावर एकदम विश्वास ठेवणे त्यास कठीण वाटल्याशिवाय राहणार नाही.

कबीरदासांच्या जन्माविषयीच्या जितक्या म्हणून कथा आजवर आपणांस ठाऊक झाल्या आहेत त्या सर्वांचा एकत्रित विचार केला असता केवळ एवढेच सांगता येईल की, वस्तुतः त्या महापुरुषास जन्म देणाऱ्या आईबापांची निश्चित अशी माहिती कोणालाच उपलब्ध झालेली नाही. त्यांचे जन्मस्थान कोणते हेही नीटसे सांगता येत नाही. लहरतारा तलावाचे नाव अनेक कथांतून आढळते. म्हणून बहुधा तेच त्यांचे जन्मस्थान मानण्याचा प्रघात पडलेला आहे. परंतु बरेचसे लोक आजमगढ जिल्ह्यातील बेलहरा नावाच्या एका गावास कबीरांचे जन्मस्थान मानतात; आणि असे म्हणतात की. हे 'बेलहरा' नावच बदलत बदलत 'लहरतारा' असे झालेले आहे. तरीही शोध केला असता, बेलहरा गावाचाही नीटसा पत्ता लागत नाही किंवा 'बेलहरा' चे 'लहरतारा' कसे बनले हेसुद्धा नीटसे कळत नाही. आणि बनले असले तरी हे आजमगढ जिल्ह्यापासून काशीजवळ कसे काय येऊ शकले? याचप्रमाणे बरेच लोक असेही मानणारे आहेत की, कबीरदास मगहर येथेच जन्मास आले होते आणि त्यांचा मृत्यूदेखील मगहर येथेच झाला होता. आणि याचा पुरावा म्हणून ते कबीरदासांचे पुढील पद सांगत असतात -

**पहिले दरसन मगहर पायो फुनि कासी बसे आई ।**

परंतु एक फार मोठी अडचण अशी आहे की, बरीचशी पदे आणि दोहे दुसऱ्या मंडळींनीच बनवून कबीरदासांच्या नावावर घुसडून दिलेले आहेत. अशाच प्रकारचे एक पद पूर्वीही उद्‌धृत केले गेले आहे आणि वरील ओळीचा ज्या पदात अंतर्भाव आहे तेही पद असेच प्रक्षिप्त असण्याची शक्यता आहे. खरे पाहता, केवळ इतकेच नक्की सांगता येते की, कबीरदासांचे पालनपोषण नीरू आणि नीमा यांनी केले. ही दोघे जातीने कोष्टी होती आणि काशी येथे राहत असत.

कबीरांच्या बाल्यकालासंबंधी अशाच नाना प्रकारच्या कथा प्रसिद्ध आहेत. असे म्हणतात की, काही खाण्यापिण्यावाचून त्याची शारीरिक वाढ होत असे. असे पाहून नीरू आणि नीमा यांना मोठीच काळजी वाटू लागली. ती दोघे विचार करीत - हे मूल असले कसले की जे अजिबात काही खातपीतच नाही! त्यांना अशी कष्टी झालेली पाहून कबीराने दूध पिण्यास सुरुवात केली. परंतु हे दूधही मोठ्या अद्भुत रीतीने काढण्यात येत असे. एका न व्यालेल्या गायीखाली मातीचे एक नवे भांडे ठेवून देण्यात येत असे. कबीरदास त्या कालवडीकडे दुधाच्या इच्छेने जेव्हा पाहत असत तेव्हा लगेच ते भांडे दुधाने काठोकाठ भरून जात असे. आणि असेच दूध ते रोज प्राशन करीत असत.

कोष्ट्याच्या घरी वाढत असतानाही राम, गोविंद आणि हरी इत्यादी ईश्वराची नावे कबीरदासांना पसंत वाटत असत. त्या काळी ज्या सुलतानाचे राज्य होते तो कट्टर होता; आणि जनतेवर धार्मिक जुलूम होत असत. अशा परिस्थितीत दोन धर्मीयांमध्ये परस्पर प्रेमाऐवजी तिरस्काराची भावना अधिक दिसून येत असे. मुसलमानाच्या घरी वाढणाऱ्या मुलाने रामनामाचा जप करावा हे त्या समाजास रुचले नाही, हे स्वाभाविकच म्हणावयास हवे. मुसलमान लोक कबीराचे हे चाळे पाहून चिडून जात आणि संतापाने म्हणत - "हे पोर भारी नास्तिक (काफिर) निपजणार आहे!" कबीरदास याचे उत्तर देताना म्हणत असत, "जो दुसऱ्याच्या संपत्तीचे अपहरण करतो तो काफिर होय; ढोंग करून समाजाला फसवितो तो काफिर; निष्पाप जीवांचा नाश करतो तो खरा नास्तिक होय!" कबीरदासांच्या काही पदांतून त्यांच्या जीवनाच्या ह्या कटू अंगाचे खरेखुरे दर्शन व्हावयास मदत होते. अशी काही पदे निश्चितच त्यांनी स्वतः रचलेली आहेत. ती पदे प्रामाणिकच समजावयास हवीत. कबीरदासांच्या धार्मिक समन्वयवादी विचारांचा विकास आस्ते आस्ते होत होता. मुस्लिम समाजात जन्म झालेला असल्यामुळे त्यांनी सर्वांत आधी मुसलमानांना फटकारले. एका पदात ते काजीला म्हणतात, "तू पुस्तकी ज्ञानाची पोपटपंची सोडून दे, आणि रामाचे भजन कर, नाहीतर तुझ्या हातून मोठाच अन्याय घडून येईल. मी तर त्या प्रभू रामाचाच आश्रय घेतलेला आहे. मग तुरूक लोक मला समजावून सांगता सांगता थकले तरी त्याची मला पर्वा वाटत नाही."

**छांडि कतेव राम भजु बौरे, जुलुम करन है भारी ।**
**कबीरै पक टेकड़ी रामकी, तुरूक रहे पचि हारी ॥**

कबीरदास यांनी पुस्तकाबद्दल म्हणजे कुराणाविषयी जे सांगितले त्याचप्रमाणे त्यांनी वेदपुराणांचीही निर्भर्त्सना केली. त्यांचा राम सर्वसामान्य हिंदूंच्या परंपरागत रामापेक्षा भिन्न होता. तथापि, राम हा शब्द त्यांना पसंत होता. ते बालपणापासूनच रामभक्तीच्या भजनरंगी रंगून गेले होते. या ईश्वरीय आनंदात गुंग असल्यामुळे कधी कधी ते आपला सूत कापण्या-विणण्याचा व्यवसायही विसरून जात असत. यामुळे नीमा नेहमी काळजीत पडायची आणि म्हणायची, "देवा! ह्या माझ्या मुलाचं कसं रे बाबा व्हायचं? हा जगणार तरी कसा?" परंतु अशा वेळी आपल्या आईची समजूत काढून कबीरदास म्हणायचे, "जेव्हा मी धोट्यामध्ये सूत ओवू लागतो तेव्हा माझा तो आवडता राम मला सोडून चालला आहे की काय, अशी भीती मला चाटून जाते. मी तरी काय करू? पण तू मुळीच चिंता करू नकोस. तो ईश्वर तिन्ही लोकांची चिंता वाहणारा आहे. तोच आपल्या सर्व गरजा पूर्ण करील."

**तनना बुनना तज्यौ कबीर ।**
**राम नाम लिखि लियौ सरीर ॥**
**मुसि मुसि रोवै कबीर की माई ।**
**यह बारिक कैसे जीवै खुदाई ॥**
**जब लगि तागा बाहौं बेही ।**
**तब लगि बिसरै राम सनेही ॥**
**कहत कबीर सुनहु मेरी माई ।**
**पूरनहारा त्रिभुवन राई ॥**

हिंदू देवदेवतांचे भजन करतो म्हणून एकीकडे मुसलमानधर्मीय लोक कबीरावर रुष्ट होते, तर दुसरीकडे कबीर आपल्या मूर्तिपूजा, स्पृश्यास्पृश्यता इत्यादींची रेवडी उडवितो म्हणून हिंदू प्रजाजनही त्याच्यावर सदैव चिडलेले असायचे. कारण, वर सांगितल्याप्रमाणे, त्यांचा राम हिंदूंच्या रामापेक्षा भिन्न होता. कबीर या सर्व कटकटींमुळे त्रस्त होऊन गेले. असे सांगतात की, याच काळात त्या वेळचे सुप्रसिद्ध वैष्णव आचार्य स्वामी रामानंद काशी येथेच वास्तव्य करून होते. त्यांच्याकडून आपण दीक्षा घेऊन टाकावी, असे कबीरदासांच्या मनात आले. परंतु त्यांच्यापुढे फार मोठा पेच पडला. एका यःकश्चित कोष्ट्याच्या पोराला वैष्णव आचार्य दीक्षा कशी होणार? या अडचणीवर मात करण्यासाठी त्यांनी एक युक्ती शोधून काढली. स्वामीजी रोज भल्या पहाटेच उठून आपल्या शिष्यपरिवारासमवेत गंगास्नानासाठी जात असत. एके दिवशी तांबडे फुटण्यापूर्वीच कबीरदास उठले आणि त्यांच्या मार्गांवर ठाण मांडून बसले. स्वामीजी रामनामाचा उद्घोष करीत तेथून निघून गेले. त्यांचे दर्शन घेऊन 'राम' नामाचाच गुरुमंत्र समजून कबीरदास आपल्या घरी परतले. नंतर कंठी माळा धारण करून सर्वत्र सांगू लागले की, "रामानंदांनी आपला शिष्य म्हणून माझा स्वीकार केला आहे." काही लोक असेही सांगतात की, भल्या पहाटेच्या अंधारात जेव्हा स्वामीजींच्या खडावांमुळे रस्त्यात बसलेल्या कबीराला धक्का लागला तेव्हा "हाय राम" असे उद्गार त्यांच्या तोंडून निघून गेले, आणि कबीराने तोच गुरुमंत्र मानून त्याचा स्वीकार केला.

ही गोष्ट कानी पडताच नीरू आणि नीमा अधिकच काळजीत पडली. आपल्या जमातीचे रीतिरिवाज धाब्यावर बसवून कपाळाला टिळा लावणारा आणि गळ्यात माळ अडकविणारा हा घरबुडव्या पोर कोठून जन्माला आला, असे त्यांना होऊन गेले. इकडे हिंदू समाजामध्येही खळबळ उडाली. स्वामी रामानंदांनी एका मुसलमानाच्या पोराला दीक्षा देऊन हा काय गोंधळ उडवून दिला आहे, असा त्यांना प्रश्न पडला. शेवटी, ही गोष्ट स्वामीजींपर्यंतही जाऊन पोहोचली. त्यांनाही फार आश्चर्य वाटू लागले. कारण, आपण असे काही केल्याचे त्यांना स्मरत नव्हते. खरा काय प्रकार आहे ते जाणून घेण्यासाठी त्यांनी कबीराला बोलावणे पाठविले. जेव्हा कबीरदास येथे जाऊन पोहोचले, तेव्हा स्वामी रामानंद मानसपूजा करण्यात गढलेले होते. त्यांच्या चारही बाजूंना पडदे सोडलेले होते. या मानसपूजेसाठी सर्व प्रकारची सामग्री तर तेथे ठेवलेलीच होती; परंतु काहीतरी कमी पडत होते. त्यामुळे स्वामीजींची

पूजा पूर्ण होण्यात दिरंगाई होत होती. कबीरदास बाहेरून हे पाहत होते. त्यांनी बाहेरूनच म्हटले, "स्वामीजी, तुम्ही आत्मदेवाला तुळशीपत्र तर अर्पण केलेच नाहीत!" हे ऐकून रामानंदांना मोठे आश्चर्य वाटले. त्यांनी कबीराला विचारले, "अरे बाबा, तू माझा शिष्य आहेस म्हणून सांगतोस खरा, पण मी तुला दीक्षा केव्हा दिली?" ज्या वेळी 'रामानामा' चा जप करीत आचार्य गंगास्नानास निघाले होते तेव्हा आपण कसे मार्गात बसलेले होतो तो सारा वृत्तान्त कबीरदासांनी स्वामीजींस कथन केला. त्यावर स्वामीजी म्हणाले, "अरे, अशा प्रकारे का कुठे गुरु-शिष्य-संबंध स्थापित होतो?" हे ऐकून मोठ्या आर्जवी शब्दांत कबीरदासांनी प्रश्न विचारला, "महाराज! वेदशास्त्रांमध्ये रामनामाहून श्रेष्ठ असा ईश्वरप्राप्तीचा आणखी काही उपाय कथन केला आहे काय?" स्वामीजी म्हणाले, "नाही. भगवंताच्या नामस्मरणाहून थोर असा दुसरा कोणताही मार्ग शास्त्रात सांगण्यात आलेला नाही." यावर कबीरदास म्हणाले, "मग स्वामीजी, याहून मोठे असे दुसरे कोणते रहस्य आहे की जे आपण शिष्यास दीक्षा देतांना सांगता?" हे उत्तर ऐकून स्वामीजी अत्यंत प्रसन्न झाले. त्यांनी पडदा दूर सारून कबीरदासांस दर्शन दिले. आणि त्यांस आपला शिष्य म्हणून मान्यता दिली.

अशा प्रकारचे अनेक प्रसंग आले. कबिराच्या तर्कपटू बुद्धिमत्तेपुढे आचार्यांना जुळते घ्यावे लागे आणि ते आपले म्हणणे मागे घेत असत. तसे पाहायला गेले तर अशा प्रकारचे अनेक गमतीदार चुटके प्रसिद्ध आहेत. त्यांतील एक जरा मनोरंजक अशी कथा सांगायची झाली तर - एकदा आपल्या पितरांचे श्राद्धकर्म पार पाडण्यासाठी स्वामीजींना गायीच्या दुधाची आवश्यकता भासली. त्यांनी दूध आणण्यासाठी कबीरदासाची रवानगी केली. कबीर एका मेलेल्या गायीपाशी जाऊन पोहोचले आणि तिच्याजवळ दुधाचे भांडे ठेवून देऊन ते तिच्या तोंडापाशी गवताच्या पेंढ्याच पेंढ्या आणून ठेवू लागले. आता मेलेल्या गायीने दूध कसे द्यावे, आणि दूध घेतल्याशिवाय कबीरदासाने तरी परत कसे जावे? जेव्हा खूपच वेळ होऊन गेला तेव्हा कबीरदासाचा शोध करण्यासाठी म्हणून आचार्यांनी आणखी काही शिष्यांना रवाना केले. शिष्यमंडळींनी परत येऊन आचार्यांना सर्व प्रकार वर्णन करून सांगितला. स्वामीजींनी जेव्हा या अजब खटाटोपाचे कारण काय अशी कबीराला विचारणा केली, तेव्हा ते उत्तरले, "स्वामीजी, मी मनात असा विचार केला की, मेलेल्या पितरांचे श्राद्ध करण्यासाठी मेलेल्या गायीचे दूधच चांगले ठरेल. परंतु दूध देण्याचेच काय घेऊन बसलात, ती गाय तर चारासुद्धा खायला तयार होत नाही." स्वामीजी म्हणाले, "काल मेलेली गाय कधी चारा खाते?" हे बोलणे पूर्ण होते न होते तोच कबीरदास म्हणाले, "जर आताच थोड्या वेळापूर्वी मेलेली गाय चारा खाऊ शकत नाही तर मग वर्षानुवर्षांपूर्वी मेलेले आपले पितर आपण जे देत आहात ते दूध तरी कसे पिणार?" यावर स्वामीजींपाशी द्यायला काही उत्तरच शिल्लक नव्हते.

ही गोष्ट खरी असेल अथवा नसेलही. परंतु यावरून लोकांच्या डोळ्यांसमोर कबीरदासांच्या व्यक्तित्वाचे नेमके कोणत्या प्रकारचे चित्र राहिले होते, हे मात्र निश्चितपणे

कळून येते. त्यांची तर्क करण्याची पद्धत मोठी वैशिष्ट्यपूर्ण, आणि उपहासयुक्त बोलणे मार्मिक आणि प्रभावी असे. त्यांच्या काव्यामध्ये पदोपदी त्यांच्या या वैशिष्ट्ययुक्त शैलीची ओळख पटते. यातूनच त्यांचे फक्कड व्यक्तित्व झळकते. हिंदू आणि मुसलमान यांच्या बाह्याचारी धर्मकल्पनांचा उपहास करून त्यांचे खंडन करताना त्यांनी अशाच प्रकारे खोचक शैलीत समजुतीच्या चार गोष्टी सांगितल्या आहेत. वर दिलेली गोष्ट ही अशाच प्रकारची आहे. एक गोष्ट अशी सांगतात की, एकदा दोन ब्राह्मणांमध्ये शास्त्र-चर्चा सुरू होती. एक म्हणत होता, ईश्वर एकच आहे. आणि दुसरा दोन आहेत म्हणून सांगता होता. दोघेही चर्चा करीत राहिले आणि शेवटी निर्णय द्या म्हणून कबीरदासांकडे येऊन पोहोचले. त्यांनी त्यांचे सर्व म्हणणे लक्षपूर्वक ऐकून घेतले. आणि नंतर त्या दोघांनाही उद्देशून त्यांनी असा प्रश्न विचारला, "तुम्ही ईश्वराला कोणत्या रंगाचा मानता? - हिरवा, पिवळा, काळा इत्यादी रंगांपैकी ईश्वराचा रंग नेमका कोणता आहे?" यावर दोघांही पंडितांनी असे उत्तर दिले की, "ईश्वराचा असा कोणताही रंग असत नाही." कबीरदासांनी त्यांना पुन्हा प्रश्न विचारला, "मग त्याचे रूप तरी कसे आहे–गोरे की सावळे?" यावरही त्या दोघांनी एकच उत्तर दिले - "ईश्वराचा रंग गोराही नाही, किंवा सावळाही नाही." नंतर कबीरदासांनी त्यांना ईश्वराच्या आकारासंबंधी प्रश्न विचारला - "तो केवढा आहे–पहाडाएवढा प्रचंड आहे की मुंगीएवढा छोटा आहे?" पंडितांनी याही प्रश्नाचे एकमुखाने नकारार्थी उत्तर दिले. यानंतर मग कबीर त्यांना म्हणाले, "अहो, भल्या माणसांनो, जर त्याचे कोणतेही एक रूप नाही. कोणता रंगही नाही आणि कसला आकार-प्रकारही त्याला नाही, तर मग त्याची तुम्ही गणना कशी करणार? तो एक नाही, किंवा दोनही नाही. खरे सांगायचे, तर तो एकाच वेळी सर्व वस्तुमात्रांमध्ये सामावलेला आहे!"

ही कथाही कदाचित नंतर कोणी कल्पिलेली असेल. परंतु कबीरदासांच्या स्वभावाची पुरेपूर ओळख करून देणारी अशी ही गोष्ट वाटते. उदाहरणादाखल म्हणून त्यांचे एक अशाच प्रकारचे पद सांगता येईल. येथेही आपल्या सहज, सुबोध पण अत्यंत मनोरंजक अशा पद्धतीने ते भक्तांची महती अशा प्रकारे स्पष्ट करून सांगत आहेत-

**झगरा एक निबेरहु राम ।**
**जे तुम्ह अपने जन सौं काम ।।**
**ब्रह्मा बड़ा कि जिन रे उपाया ।**
**वेद बड़ा कि जहां ते आया ।।**
**यहु मन बड़ा कि जेहि मन मानैं ।**
**राम बड़ा कि रामहिं जानैं ।।**
**कहै कबीर हौं भया उदास ।**
**तीरथ बड़ा कि हरि का दास ।।**

किती साध्यासुध्या शब्दांत किती थोर विचार सांगितलेले आहेत!

कबीरपंथीयांशिवाय अन्य अनेक लोकही स्वामी रामानंदांनाच कबीरदासांचे गुरू मानतात. परंतु जेव्हा आपण या दोघांच्या काळाचा एकत्र विचार करू लागतो, तेव्हा ही गोष्ट मानण्यातही काही अडचणी उपस्थित होतात. स्वामी रामानंद यांचा मृत्यू विक्रम संवत १४६७ मध्ये झाला; आणि वर नमूद केले आहे त्याप्रमाणे कबीरदासांचा जन्म संवत १४५५ मध्ये झाला असे मानण्यात येते. यावरून असे दिसते की, स्वामीजींची जीवनलीला जेव्हा समाप्त झाली त्यावेळी कबीराचे वय अवघे दहा-बारा वर्षांच्या आसपास असले पाहिजे. त्यापूर्वी दोनचार वर्षे कबीराने दीक्षेचा स्वीकार केला असे म्हटले तर त्याचे वय आणखी कमी असले पाहिजे. इतक्या कमी वयात त्यांनी दीक्षा स्वीकारली असावी, या गोष्टीवर विश्वास बसत नाही. म्हणूनच की काय अनेक लोक कबीरदासांचा जन्मशक थोडासा मागे घेऊन जाऊ पाहतात. परंतु असे करणे किनपत उचित आहे, हे सांगणे जरा कठीण आहे.

आपण असे पाहतो की, कबीरदासांच्या जन्माविषयीच्या अनेक प्रचलित कथांतून स्वामी रामानंदांचे नाव परोपरीने येत असते. आणि ते अशा प्रकारे येते की, त्यावरून स्वामी रामानंदांना मोठेपणा देण्यासाठीच त्या नावाचा अंतर्भाव मागाहून करण्यात आला आहे असे वाटते. स्वामी रामानंद आपल्या काळातील कदाचित सर्वश्रेष्ठ महापुरुष होते. परंतु केवळ एवढ्यावरूनच त्यांच्याकडून कबीरास दीक्षा प्राप्त झाली असे म्हणता येणार नाही. तसे पाहता, कबीरदासांची स्वतःची म्हणून जी पदरचना निश्चित वाटते तिच्यात त्यांच्या स्वतःच्या काळातील एकाही व्यक्तीचे नाव आढळून येत नाही. त्यांचे केवळ एकच एक पद असे आहे की ज्यात 'मतिसुंदर' नावाच्या कोणा एका महापुरुषाचे नाव आले आहे. त्या पदाचा प्रारंभ असा आहे –

**मेरी मति बउरी मैं राम बिसारयौं, केहि बिधि रहनि रहौं रे ।**
**सेजैं रमत नैन नहिं पेखौं, यह दुख कासौं कहौं रे ।**

आणि या पदाचा शेवट करताना असे म्हटले आहे -

**सोचि बिचारि देखौ मन मांही; औसर आइ बन्यौं रे ।**
**कहे कबीर सुनहु मतिसुंदर, रान राम रमौं रे ॥**

तसे पाहिले तर या पदात आलेल्या "मतिसुंदर" या शब्दाचा अर्थ "चांगली बुद्धी" असासुद्धा लावला जाऊ शकतो. परंतु हे कोणा व्यक्तीचेही नाव असू शकेल. मतिसुंदर नामक एका संतकवीचीही काही पदे उपलब्ध आहेत. पण निश्चितपणाने असे म्हणता येणार नाही की त्यांनाच उद्देशून कबीरदासांनी हे पद म्हटले आहे. अन्य कोणास उद्देशून म्हटले असण्याचीही शक्यता आहे. शिवाय या दोन संत पुरुषांमध्येही परस्परसंबंध कशा प्रकारचा होता, हेही स्पष्ट होत नाही.

कबीरदास सिद्धी प्राप्त केलेले महापुरुष होते. परंतु त्याचबरोबर ते स्वतः गृहस्थही होते. त्यांचे दुसरेही एक वैशिष्ट्य सांगावयास हवे. प्रपंचपरिवारात राहून भक्ती करणे शक्य आहे असा त्यांचा दृढ विश्वास होता. त्यांच्या चरित्रासंबंधीचे जितके म्हणून प्राचीन ग्रंथ उपलब्ध आहेत त्यांत वरील गोष्टीचा स्पष्ट निर्देश आहेच. शिवाय त्यांच्या अनेक पदांतूनही प्रपंच आणि परमार्थ एकाच वेळी साधण्यासंबंधीचे स्पष्ट उल्लेख येतातच.

'कबीर साहब की परचई' या नावाचे कबीरदासांचे एक चरित्र संवत १६४५ च्या सुमारात अनंतदास नामक एका प्राचीन कालातील संतांनी लिहून ठेविले आहे. त्यामध्ये त्यांनी असे स्पष्ट सांगून ठेविले आहे की, कबीरदास कपडे विणून ते विकण्यासाठी बाजारात घेऊन जात असत. आणि या विक्रीतून जो काही फायदा होत असे त्यातूनच स्वतःचा आणि आपल्या कुटुंबीयांचा चरितार्थ ते चालवीत असत. आल्या-गेल्या भक्तजनांसही ते खावू-जेवू घालीत असत. एके दिवशीची गोष्ट सांगतात–एक गरीब ब्राह्मण बाजारात त्यांच्याजवळ आला आणि आपले शरीर झाकण्यासाठी त्यांच्याकडे अत्यंत अर्जाजीने कापड मागू लागला. कबीरांनी अर्धा तागा कापड त्याला देऊ केले. पण तेवढ्यावर त्या याचकाचे समाधान होईना. त्याने सर्वच तागा द्या म्हणून नम्रतापूर्वक विनवणी केली. कबीरदासांना त्या गरीब ब्राह्मणाची दया आली. त्यांनी त्या दिवशी तयार केलेले सर्व वस्त्र त्याला दान करून टाकले. त्यांनी सर्व कापड देऊन टाकले खरे, पण घरच्या मंडळींना खाण्याजेवण्यासाठी काही देता येणे आता आपल्याला शक्य नाही या विचाराने ते खिन्न झाले. ग्लानीमुळे त्यांना घरी परतायची हिंमत होईना. म्हणून ते बाजारात इकडे तिकडे कोठेतरी दडून बसून राहिले. घरच्या मंडळींनाही त्यांच्याविषयी काही पत्ता लागला नाही; आणि असेच तीन दिवस उलटून गेले. इकडे घरातील लोक भुकेमुळे तडफडू लागले. त्याच वेळी एक चमत्कार घडला. खाण्यापिण्याच्या सर्व वस्तू एका बैलावर लादून एक माणूस आला आणि मोठ्या आग्रहाने त्या सर्व वस्तू तो कबीराच्या घरी ठेवून गेला. हा सर्व प्रकार पाहून नीमास मोठे आश्चर्य वाटले. कारण, तिला आपल्या मुलाचा स्वभाव चांगला ठाऊक होता. तो एककल्ली मुलगा परिश्रम केल्याशिवाय कोणाकडून एक पैसुद्धा कधी घेत नाही, हे ती जाणून होती. तिने त्या नवख्या माणसास विचारल्यावर त्याने उत्तर दिले, "काशीविश्वेश्वराचे दर्शन घेण्यासाठी एक राजा येथे आलेला आहे. त्याने तुमच्या मुलावर प्रसन्न होऊन त्यास पुष्कळसे धन देऊ केले. परंतु जेव्हा वारंवार विनंती करूनही तो त्या द्रव्याचा स्वीकार करायला तयार होईना, तेव्हा राजेसाहेबांनी नम्रतापूर्वक हे खाण्यापिण्याचे सामान आपल्या घरी धाडून दिले. आता एवढ्यात आपला मुलगाही घरी येईलच." एवढेच बोलून आणि आपल्याबद्दल कोणतीही खरी माहिती न सांगता तो माणूस तेथून निघून गेला. आणि नीमालाही मग असे वाटले की, न जाणो हा माणूस सांगतो आहे त्या सर्व गोष्टी खऱ्यासुद्धा असतील. काही लोक हे कळताच धावतच कबीरांपाशी पोहोचले, आणि त्यांनी त्यांना ही गोष्ट सांगितली. कबीर जेव्हा घरी पोहोचले तेव्हा नीमाने त्यांना घडलेली सर्व हकिगत वर्णन करून सांगितली. मग कबीरांसही मनोमन असा विश्वास

वाटू लागला की, त्या दीनबंधू ईश्वराशिवाय ही अद्भुत करणी दुसरा कोण करणार! या विश्वासाने तर त्यांचे आत्मबळ अधिक दृढ बनले आणि त्यांनी ताण्याबाण्याचा आपला उद्योग बंद करून ते नित्य हरिभजनात रंगून जाऊ लागले. त्यांनी सर्व संतजनांना पाचारण करून एक मोठाथोरला संत-भोजनाचा उत्सव साजरा केला आणि आपल्या घरात जेवढे म्हणून काही उरले होते ते सर्वांना खाऊपिऊ घातले.

हे सर्व पाहून काशीचा समस्त ब्रह्मवृंद आणि संन्यासीवर्ग द्वेषाग्नीने जळू लागला आणि आता ते सर्व जण एकत्र येऊन कबीराची फजिती कशी करता येईल याचा विचार करू लागले. सर्वांनी मिळून शेवटी असा निर्णय घेतला की, या कबीराचे नाक कापून याला शहराच्या बाहेर हाकून द्यावा. हे सर्व विचित्र नाटक पाहावयासाठी संपूर्ण काशीनगरी लोटली. सर्वांनी जाऊन कबीराच्या घरास घेरून टाकले. कबीराने त्या सर्वांना मोठ्या सन्मानाने आपल्या घरी बसविले आणि त्या सर्व मंडळींनी त्याच्याकडे उठून येण्याची कृपा कशी काय केली म्हणून तो विचारू लागला. ब्राह्मण मंडळींनी संतापून सांगितले, “तुम्हांला आजच हे शहर सोडून जावे लागेल!” यावर कबीर म्हणाला, “माझ्यावर आपण सर्व मंडळींनी इतके क्रुद्ध व्हावे असा मी कोणता एवढा अपराध केला आहे? मी कोणाचीही काही चोरी केलेली नाही, किंवा मी कोणाच्या प्रतिष्ठेस धक्का पोहोचेल असेही काही केलेले नाही! मी रामाचे नाव जपत असतो, आणि माझ्या मार्गाने जात असतो.”

मग ब्राह्मण म्हणू लागले - “तू जेवणावळ घालून शूद्रांना खायला-प्यायला घातलेस, आणि या बाबतीत आम्हांला काही विचारलेसुद्धा नाहीस. आता तू आम्हां सर्वांना शिधा तरी देऊन टाक, नाही तर आमचे हे गाव सोडून चालता हो!” कबीरदास भलत्याच धर्मसंकटात सापडले. घरात तर अन्नाचा एक दाणाही शिल्लक नव्हता, आणि आता या सर्व लोकांना तर अन्न द्यायला हवे होते. कारण न देण्याने अधर्म होणार होता. मी सर्व सामानाची जरा व्यवस्था करून येतो असे सांगून त्यांनी तात्पुरती वेळ निभावून नेली.

काही वेळानंतर भगवंताने अशी काही कृपा केली की एक माणूस अनेक मजुरांच्या शिरांवर पीठ, तांदूळ, साखर इत्यादी सामानांची पोती लादून ब्राह्मणमंडळींच्या समीप पोहोचला. या माणसाचे नाव कोठे कोठे केशव बंजारी असे दिलेले दिसून येते. या केशव बंजाऱ्याने सर्व ब्रह्मवृंदांस प्रत्येकी अडीच अडीच शेर शिधा आणि वर पानाचा एकेक विडा हाती देऊन त्यांना निरोप दिला. अशा प्रकारे शिधा प्राप्त होताच ब्राह्मण समाजाचा राग कोठल्या कोठे निघून गेला, आणि ते सारे “धन्य धन्य” म्हणत आपापल्या घरी परत गेले. रस्त्यातून जाताना ती मंडळी एक दुसऱ्यास म्हणतच चालली होती की, आता जो कबीराच्या विरुद्ध काही बोलेल तो नरकात पडेल.

भगवंताची लीला अद्भुत आहे. तो एका ब्राह्मणाचे रूप घेऊन जेथे कबीरदास लोकांना चुकविण्यासाठी तोंड लपवून बसले होते तेथे जाऊन पोहोचला आणि त्यांना उद्देशून म्हणाला, “कबीरदासा, आता बाळा तू तुझ्या घरी रे का जात नाहीस? तेथे तर मोठा शुभयोग

जुळून आला आहे. सर्व ब्राह्मणांना आणि साधुसंन्याशांना शिधा वाटण्यात येत आहे. हे पाहिलेस, मीही तेथूनच तर शिध्याची ही गाठोडी घेऊन चालला आहे."

हे ऐकून कबीरांची खात्री झाली. भगवंताने पुन्हा एकदा कृपेचा वर्षाव करून त्यांची अब्रू राखली होती. ते घरी येऊन पाहतात तो काय, अन्नाचा भला मोठा ढीग पडलेला होता. आणि सर्व ब्राह्मण शिधा घेत घेत आशीर्वचनांचा वर्षाव करीत परत चालले होते. कबीर प्रकटपणे काही बोलू शकले नाहीत. पण मनातल्या मनात ते विचार करीत होते... माझा कर्ताकरविता किती महान आहे! त्याच्याविना दुसरा कोण मला एवढे महत्त्व देईल? आणि त्याच्याशिवाय अन्य कोण मला आपला उदार आश्रय देत राहील? अशा विचारांनी त्यांची भगवंतावरील श्रद्धा अधिकच दृढ होत गेली.

ही कथा जरा अतिशयोक्ती करून सांगितली गेली असण्याची शक्यता आहेच; परंतु तिच्यावरूनही काही निष्कर्ष काढता येतात. कबीरदासांना आपल्या प्रपंचाची आणि कुटुंबीयांच्या पालनपोषणाची काळजी तर असायचीच पण साधुसंतांच्या सेवासत्काराची चिंता त्यांना त्याहूनही अधिक लागून राहिलेली असे. स्वतः दुःख झेलून ते त्यांना सुख लाभावे म्हणून सदैव प्रयत्न करीत असायचे.

अशा प्रकारच्या घटना घडत राहिल्याने कबीरदासांना उदंड कीर्ती लाभली आणि तेव्हापासून त्यांच्या घरी लोकांची खूप गर्दी जमू लागली. लोकांच्या या गर्दी करण्याने त्यांच्या भगवद्भजनांत खंड पडत असे, आणि म्हणून या अडचणीतून सुटका करून घेण्यासाठी त्यांनी एक उपाय शोधून काढला. ते एके दिवशी सकाळीच उठून कोण्या एका वेश्येच्या घरी गेले आणि तिच्या खांद्यावर हात ठेवून बाहेर रस्त्यावर आले, आणि चालू लागले. आपल्याबरोबर त्यांनी ईश्वराचे चरणतीर्थसुद्धा नेले होते. ते तीर्थ नसून ती दारूच आहे असे लोकांना भासवून ते प्राशन करू लागले. असाच प्रकार करीत ते बाजारातून जात होते. त्यांचा त्यात असा उद्देश होता की, लोकांना वाटावे ह्याचे सारे ज्ञान आणि ध्यानधारणा आता भ्रष्ट झाली आहे. नगरवासीयांमध्ये एकच एक धमाल उडून गेली आणि सर्व मंडळी एकत्र जमून त्यांची चेष्टा उडवू लागली. लोकांचे म्हणणे आता असे होते, "भक्ती तर काय आपण करू असे सर्वच जण म्हणतात. पण हलक्यासलक्या कुटुंबात जन्माला आलेल्यांकडून भक्ती होऊच शकत नाही. काही दिवस कबीरदाससुद्धा भक्ती करीत होते. पण शेवटी तो जातीचा कोष्टी तो कोष्टीच! आता पाहा, कसा वेश्येच्या नादी लागला आहे!" कबीरदास अशाच अवतारात त्या नगरीच्या राजेसाहेबांच्या घरी गेले. यापूर्वी राजा त्यांचा मोठा आदरसत्कार करीत असे. आणि मोठे स्वागत करून त्यांना आसनावर बसवीत असे. पण हा सारा चमत्कारिक प्रकार पाहून तो आश्चर्यचकित झाला आणि त्याने त्यांना राजसभेबाहेरच बसण्याची आज्ञा दिली. कबीरदासांसारख्या श्रेष्ठ भक्ताचे असे कसे अधःपतन झाले या विचाराने सारी राजसभा बुचकाळ्यात पडली.

याच वेळी कबीरांनी बसल्याबसल्या आपल्या कमंडलूतील थोड्याशा पाण्याचा शिडकावा केला. हे पाहून तर राजास अधिकच आश्चर्य वाटले. त्याने त्यांच्या या कृतीसंबंधी त्यांना

विचारले. त्यावेळी कबीरांनी उत्तर दिले, "सांगूनसवरून कधी कोणास विश्वास वाटणार नाही. खरे सांगायचे म्हणजे जगन्नाथाच्या मंदिरातील एका पुजाऱ्याला जरा भाजले होते. त्याचे रक्षण करावे म्हणूनच मी या तीर्थ-जलाचा शिडकावा केला." राजाने त्यावेळचा बरोबर मुहूर्त शोधून काढविला आणि ताबडतोब आपल्या एका दूतास जगन्नाथपुरीस पाठविले. खरा काय प्रकार आहे हे पाहून येण्याचे काम त्याच्यावर सोपविले होते. दूत जगन्नाथपुरीकडे निघाला. आणि इकडे कबीरदास आपल्या घराकडे परतले. दहा दिवसांनी राजदूत जगन्नाथपुरीस जाऊन पोहोचला, आणि त्याने चौकशी केली. तो काय आश्चर्य! खरोखरीच भाताचे भांडे उतरवून त्यातील पेज काढून टाकीत असताना एका पुजाऱ्याचा हात भाजला होता. त्या पुजाऱ्यानेही राजदूतास सांगितले की, कबीरदासांनीच तीर्थजलाचा शिडकावा करून माझी या भाजण्याच्या संकटातून सुटका केली. राजदूताला फार आश्चर्य वाटले. आपल्या मनातील शंकेचे निराकरण करण्याच्या हेतूने त्याने पृच्छा केली, "महाराज, आपण कोणत्या कबीराची ही गोष्ट सांगत आहात?" यावर त्या पुजाऱ्याने सांगितले की, "ही कृपा दुसऱ्यातिसऱ्या कोणी केली नसून संत कबीरदासांनी केली आहे. ते जातीने कोष्टी आहेत, आणि काशी येथे त्यांचा निवास आहे. ते रोज येथे जगन्नाथाच्या दर्शनासाठी येत असतात." हे ऐकून तर राजदूत थक्कच झाला. काशीला परत येऊन त्याने राजास सर्व हकिगत वर्णन करून सांगितली. मग त्या दिवशीच्या आपल्या चुकीच्या आचरणाबद्दल राजाला खूपच पश्चात्ताप वाटू लागला. आपल्या दुर्वर्तनाबद्दल आपण कबीरदासांकडे जाऊन त्यांची क्षमा मागावयास हवी आणि काहीतरी करून त्यांना प्रसन्न करावयास हवे असे त्याला वाटू लागले. परंतु कबीरदास कोणाकडूनही भेटवस्तूचा स्वीकार करीत नसत ही मोठीच अडचण होती. म्हणून आपल्या साऱ्या कुटुंबीयांसमवेत शिरांवर लाकडाची ओझी घेऊन आणि गळ्यात कुऱ्हाडी अडकवून कबीरदासांची क्षमा मागण्यासाठी तो निघाला. त्या काळी क्षमायाचना करण्याची हीच पद्धत रूढ होती. राजाला अशा स्थितीत पाहून कबीरदासांनी ताबडतोब पुढे होऊन त्याच्या शिरावरचा भार त्यास लगेच उतरून टाकण्यास सांगून त्याला मोठ्या सन्मानाने बसावयास आसन दिले. आणि मग कबीरदास त्याला सांगू लागले, - "तू मोठा आहेस आणि मनापासून मला मोठेपणा देण्यासाठी आला आहेस. मोठा माणूसच खरे आणि खोटे काय हे जाणू शकतो. मूर्खाला काय समजणार?" अशा प्रकारे कबीरदास जो जो आपल्या माहात्म्यास लपवून ठेवण्याचा यत्न करीत असत तो तो त्यांचा कीर्तिगंध अधिकच दरवळत होता!

वरील गोष्टीत जगन्नाथमंदिरातील पुजाऱ्याची जी हकिगत आलेली आहे ती जरी विश्वासार्ह वाटत नसली तरी दिव्य दृष्टी अथवा सिद्धी प्राप्त झालेल्या महापुरुषांच्या बाबतीत अशा प्रकारची गोष्ट संभवू शकत नाही, असे म्हणता येत नाही. वेश्येसंबंधीची ती गोष्ट निश्चितच खरी असू शकेल कारण, कबीरदासांच्या स्वभावात जी फक्कड वृत्ती भरून राहिलेली होती तिचाच प्रत्यय या गोष्टीतूनही आल्याशिवाय राहत नाही. बहुतेक कबीरपंथी ग्रंथांतून या दोन्ही घटनांची फारच थोडी चर्चा केलेली दिसून येते. परंतु, वेश्येच्या खांद्यावर हात

ठेवून येण्याच्या प्रसंगाचा उल्लेख धर्मदासानेसुद्धा आपल्या 'शब्दावली' या ग्रंथात केलेला आहे.

कबीरदासांची कीर्ती दिवसेंदिवस पसरत आहे हे पाहून ब्राह्मण पंडित आणि मुसलमान धर्मोपदेशक द्वेषाने जळू लागले, आणि त्यांना त्रास देऊन त्यांची फजिती कशी करता येईल याचा सदोदित विचार करू लागले. नेमक्या याच वेळी सुलतान सिकंदरशाहा लोदी काशी येथे आला. तो त्या वेळी दिल्ली सिंहासनावर आरूढ झालेला होता. बादशाहाला अलीकडे काही दिवसांपासून दाह रोगाने फार त्रास होत होता. त्याच्या शरीरावर उष्णता भडकून उठे आणि त्यामुळे तो सदैव त्रासलेला आणि विमनस्क असे. सर्व तऱ्हेच्या वैद्यांचा आणि हकिमांचा औषधोपचार करून झाला! पण बादशाहाला अजूनपर्यंत जरासुद्धा आराम वाटत नव्हता. त्याचा रोग काही केल्या जाईना. असे म्हणतात की, त्याला लोकांनी स्वामी रामानंद आणि कबीरदास यांच्यासंबंधीच्या अनेक आश्चर्यकारक कथा वर्णन करून सांगितल्या होत्या. म्हणून बादशाहाची स्वारी काशी मुक्कामी येऊन पोहोचली होती. काशीस आल्यावर तो स्वामी रामानंदांच्या दर्शनासाठी गेलाही होता. परंतु म्लेंछाचे तोंडसुद्धा कधी न पाहण्याचा आणि त्याला दर्शनही कधी न देण्याचा स्वामीजींचा नियम ठरलेला होता. म्हणूनच ते आपल्या चारही बाजूंस पडदा लावून ठेवीत, असे सांगतात. स्वामीजींच्या अशा या नियमामुळे निराशा पदरी आल्यावर बादशाहा कबीरदासांच्या घरी गेला. त्यांचे दर्शन होताच त्याचा दाह रोग पूर्णपणे बरा झाला. यामुळे तो त्यांचा पक्का शिष्य बनून गेला, आणि त्याने त्यांच्या चरणावर मस्तक ठेवले. कबीरदासांच्या सांगण्यावरून तो पुढे स्वामी रामानंदांचे दर्शन घेण्यासाठी गेला. त्यांच्याच शिफारशीमुळे स्वामीजींनी बादशाहास आपले दर्शनही घेऊ दिले. या घटनेनंतर बादशाहा कबीरदासांना मोठ्या सन्मानाने वागवू लागला. हे पाहून त्यांचा गुरू शेख तकी हा कबीराविषयीच्या द्वेषाग्नीने जळू लागला. बादशाहाने जर आता या हिंदू साधूलाच आपला गुरू मानले आहे तर मग आपले कसे व्हायचे? एका म्यानात दोन तलवारी कशा राहणार? असे त्यास वाटू लागले. या एकच एक विचाराने ग्रासून तो कबीराचा निःपात कसा करता येईल यासाठी आपली दुष्ट बुद्धी लढवू लागला, आणि याच वेळी काशीचे काझी, मौलवी, फकीर हे सर्व एकत्र येऊन कबीराच्या कागाळ्या सांगत शेख तकीपर्यंत येऊन पोहोचले.

अनंतदासाने लिहिलेल्या 'परचई' या ग्रंथामध्ये बादशाहा सिकंदर लोदीच्या काशीयात्रेचा उल्लेख केलेला आहे. परंतु त्याने त्याला झालेल्या रोगाचा उल्लेखही केलेला नाही, किंवा त्याच्याबरोबर असलेल्या कोणा शेख तकीचाही उल्लेख केलेला नाही. सिकंदर लोदीच्या आगमनानंतर लगेच काजी, मुल्ला, ब्राह्मण पंडित आणि व्यापारी लोकसुद्धा त्याच्या दर्शनासाठी गेले व सर्वांनीच कबीरदासांविषयीच्या तक्रारी त्यांना सांगितल्या, असे आनंददास लिहितो. सर्वांनी बादशाहास म्हटले, " हे बादशाहा! तू महान आहेस. आमचे दुःख निवारण

कर. एका कोष्ट्याने येथे मोठाच कहर उडवून दिला आहे. त्याने मुसलमानधर्मीयांचे सर्व रीतिरिवाज मोडून टाकले आहेत, आणि हिंदूंच्या धर्माचीदेखील तो निंदानालस्ती करीत असतो. तो तीर्थे आणि वेद यांची टिंगल करतो. शंकर, शारदा आणि गणेश यांची चेष्टा करतो. ब्राह्मणांची आणि त्यांच्या एकादशीसारख्या व्रतवैकल्यांची टर उडवितो. हिंदू आणि मुसलमान या दोहोंपासून स्वतःस वेगळे कल्पून त्याने आपले नवेच प्रस्थ निर्माण केले आहे. तो स्वतःच स्वतःला ईश्वर मानण्याची धृष्टता करीत असतो. हा कोष्टी जोपर्यंत या काशीमध्ये राहणार आहे, तोपर्यंत कोणी काजीला विचारणार नाही, किंवा पंडितासही कोणी किंमत देणार नाही. म्हणून आपण त्याला या नगरीच्या बाहेर हाकलून काढावे. आपण आमचे कृपाळू मायबाप आहात. म्हणून आपण आमचे रक्षण करावे." हे सर्व ऐकून बादशाहाने ताबडतोब दोन लाठीधारी सैनिक पाठवून कबीरदासाला बोलावणे केले. कबीर आल्यावर काजीने त्यास सांगितले, "बादशाहास सलाम कर!" पण कबीराने तसे केले नाही. यामुळे बादशाहास फार राग आला. त्याने विचारले, "काय रे कोष्ट्या, तू आपला धर्म सोडून असा वाकड्या मार्गाने का चालला आहेस?" यावर कबीर अत्यंत शांतपणे उत्तरले, "मला हिंदू आणि मुसलमान दोघांशीही काही कर्तव्य नाही. गुरुमाउलीच्या आशीर्वादाने मी रामाची भक्ती करीत असतो आणि सदा त्याचेच गुण गात असतो. रामाच्या भरवशामुळे मी राजा किंवा रंक कोणालाही घाबरत नाही. बादशाहालासुद्धा भीत नाही."

यावर काझीने न्याय दिला –"इस्लामची निंदा करणारा कबीर काफिर आहे, नास्तिक आहे. त्याची जपमाळ काढून घ्यावी, टिळा पुसून टाकावा, आणि त्याला दगडांनी मारझोड करावी."

यावर कबीर म्हणाले, "नास्तिक तुम्हीच आहात. कोणत्या धर्मलेखामध्ये गोहत्या करण्याची आणि बकऱ्या-कोंबड्या मारण्याची आज्ञा लिहिलेली आहे? जीवांचा वध करणाऱ्या पापीजनांची छाती तुडवून यमराज त्यांना शिक्षा करतो. मला माझ्या रामनामाचा पूर्ण विश्वास आहे. मला कोणाचेही भय वाटत नाही."

इतके सगळे ऐकून तो बादशाहा सिंहासारखा चवताळून उठला आणि त्याने कबीरदासांचे हातपाय साखळीने बांधून त्याला गंगेत जलसमाधी देऊन टाकण्याचा हुकूम फर्माविला आणि मग मारेकऱ्यांनी हुकुमाची अंमलबजावणी केली. परंतु कबीरदासांनी आपल्या आराध्याचे स्मरण केले आणि मग त्यातून चमत्कार झाला. शृंखला तुटून गेल्या; आणि कबीरदास एखाद्या आसनावर विराजमान झाल्याप्रमाणे भागीरथीच्या पावन प्रवाहावर तरंगू लागले!

काही ग्रंथांमधून असाही उल्लेख आलेला आहे की, कबीरदासांची परीक्षा पाहण्यासाठी म्हणून बादशहाने एका गायीचा वध करविला आणि तो त्यांना म्हणाला, "जर तू स्वतः परमेश्वराच्या बरोबरीचा आहेस तर मग या गायीला पुन्हा जिवंत करून दाखव." कबीरदासांनी स्पर्श करताच ती गाय पुन्हा जिवंत झाली. परंतु अगदी अशाच प्रकारची एक दंतकथा संत नामदेवांच्या संदर्भातही सांगितली जाते; आणि कोणास ठाऊक, तीच दंतकथा एखादे वेळी लोककल्पनेने कबीरदासांच्या चरित्राशी जोडून टाकली असेलही.

जेव्हा कबीरदास पाण्यात बुडले नाहीत तेव्हा त्यांना काहीतरी जादूबिदू ठाऊक असावी, नाही तर एखादी सिद्धी तरी माहीत असेल, अशा प्रकारे लोक तक्रार करू लागले. म्हणून दुसऱ्यांदा त्यांचे हातपाय बांधून एका घरामध्ये त्यांना कोंडून टाकण्यात आले आणि चारही बाजूंनी त्या घराला आग लावण्यात आली. ईश्वराने याही प्रसंगी त्यांचे रक्षण केले. ते पूर्ण घर जळून खाक झाले आणि त्याची राखही हवेमध्ये उडून गेली; परंतु कबीरदासांच्या केसालाही धक्का लागू शकला नाही.

कबीरांस प्रल्हादाच्या तोडीचा भक्त मानण्यात येते. प्रल्हादाला ठार मारण्यासाठी अग्निकुंड पेटविण्यात आले होते म्हणूनच कदाचित कबीरदासांचीही अशीच अग्निपरीक्षा पाहण्यात आली असावी. पण त्यातून ते निरपराधीच सिद्ध झाले.

सिकंदराला आता मात्र असे वाटू लागले, हा कोष्टी नक्कीच काहीतरी चेटूकबिटूक जाणत असावा. म्हणून आता या वेळी त्याने त्याच्या मुसक्या बांधून त्याला एका मस्तवाल हत्तीच्या समोर फेकून दिले. आपल्या सावलीसही प्राणी मानून तिला तुडवीत तुडवीत. तो हत्ती चालत असे. माहुताला तर काडीची किंमत देत नसे. लढायांमध्ये त्याने मोठमोठ्या शूरवीरांचा फडशा पाडलेला होता. म्हणून 'रणजित' असे त्याचे नामकरण करण्यात आलेले होते. असा पिसाळलेला हत्ती कबीरदासांचा शेवट करण्यासाठी सोडून देण्यात आला. त्याच्या भयाने थरकाप होऊन सर्व लोक दूरवर पळत सुटले. परंतु आश्चर्यच घडून आले. कबीरदासांपाशी जाऊन तो मस्त गजराज चमकून उभा राहिला आणि घाबरून स्वतःच पळू लागला. खरेतर कबीरदासांच्या जागी त्याला एक सिंहच दृष्टीस पडला! कबीरदासांनी तीनही लोकांचा कर्ताकरविता असलेल्या रामाचा धावा केला आणि त्या प्रभू रामानेही मदमस्त हत्तीच्या तावडीतून त्यांची सुटका केली.

शेख तकी आणि सिकंदर बादशहा यांनी एकूण बावन्न वेळा कबीरदासांची अशी छळाची सत्त्वपरीक्षा पाहिली, असे म्हणतात. परंतु जेव्हा यांपैकी प्रत्येक दुष्ट परीक्षेतून ते सहीसलामत सुटले तेव्हा अखेर त्यांनी आपला पराभव मान्य केला, आणि कबीरदासांची क्षमा मागितली.

सिकंदर लोदीच्याच काळात कबीरदास होते आणि दोहोंची भेटही झालेली होती असा फार फार वर्षांपूर्वीपासून संतजनांमध्ये विश्वास आढळून येतो. इतकेच काय पण वर ज्यांचे वर्णन आलेले आहे त्यांपैकी कमीतकमी तीनतरी शिक्षांसंबंधीचा उल्लेख बहुतेक सर्व संतांनी केलेला आहे. पाण्यात बुडवून मारण्याची, जळत्या आगीत फेकून दिल्याची आणि हत्तीच्या पायदळी तुडविण्याची अशा तीन शिक्षांचा उल्लेख वारंवार सापडतो.

प्रियदासाने नामादासाच्या 'भक्तमाल' ग्रंथाची टीका लिहिताना या घटनांचा उल्लेख अशाच प्रकारे केला आहे –

**देखि कै प्रभाव फेरि उपज्यौ अभाव द्विज ।**
**आयौ बादशाह जू सिकंदर से नाँव है ॥**

**विमुख समूह संग माता हू मिलाइ लई ।**
**आइ के पुकारै जू दुखायौ सब गाँव है ॥**
**लाओ रे पकरि वाको देखौं रे मकर कैसो ।**
**अकर मिटाऊँ गाढे जाकर तनाव है ॥**
**आनि ठाढ़े किये काजी कहत सलाम करौ ।**
**जानै न सलाम जामैं राम गाढ़े पाव है ॥**

यानंतर मग वर सांगितलेल्या त्या तीन शिक्षांसंबंधीचा उल्लेख आहे. संत दादूदासांचे एक शिष्य रज्जबदासही असे म्हणतात की –

**जन कबीर जड़ि जंजीर बोरे जल मांहीं ।**
**अग्नि नीर गंज त्रास राखे किधौं नाहीं ॥**

याचप्रमाणे रोहंतक जिल्ह्यातील छुडानी गावचे संतकवी गरीबदास साहेब यांनीही आपल्या 'ग्रंथसाहब' या ग्रंथात या घटनांचा उल्लेख केलेला आहे. आणि सर्वांत जास्त महत्त्वाचा पुरावा स्वतः कबीरदासांच्या पदांत आढळून येतो. त्यांच्या दोन पदांतून गंगेत बुडवून मारण्याचे आणि हत्तीच्या पायदळी तुडविण्याच्या घटनांचे वर्णन आलेले आहे. ती पदे अशी आहेत.

त्यांपैकी गंगेत फेकून देण्यासंबंधीचा उल्लेख असा -

**मन न डिगै तनु काहे कौ डेराइ ।**
**चरन कमल चिंतु रह्यौ समाइ ॥**
**गंगा गुसाइनि गहिर गंभीर । जंजीर बांधि करि खरे कबीर ॥**
**गंगा की लहरि मेरी टुटी जंजीर । म्रिगछाला पर बैटे कबीर ।**
**कहै कबीर कोई संग न साथ । जल थल में राखै रघुनाथ ॥**

हत्तीच्या पायदळी तुडविले जाण्याचे वर्णन करताना कवी म्हणतो -

**आहि मेरे टाकूर तुम्हरा जोर ।**
**काजो बाकिबो हस्ती तोर ॥**
**भुजा बांधि मिला करि डारयौ ।**
**हस्ती कोपि मूंड़ महिं मारयौ ॥**
**भाग्यौ हस्ती चीसा मारी ।**
**या मूरति की हौं बलिहारी ।**
**रे महावत तुझु डारऊं काटि ।**
**इसहिं तुरावहु घालहु सांटि ॥**
**हस्ती न तोरे धरै धियांन ।**
**वाके हिदै बसै भगवान ।**

**क्या अपराध संत है कीन्हां ।**
**बांधि पोटि कुंजर कौं दीन्हां ॥**
**कुंजर पोट बहु बंदन करै ।**
**अजहूं न सूझै काजी अंधरै ॥**
**तीनि बेर पतियारा लिन्हां ।**
**मन कठोर अजहूं न पतीना ॥**
**कहै कबीर हमरा गोबिंद ।**
**चऊथे पद महिं जन की जिंद ॥**

तिसऱ्या एका पदामध्ये आगीत जाळून टाकण्याच्या प्रकाराचाही उल्लेख मिळतो, तो असा -

**राम जपत तनु जारि किन जाइ ।**
**राम नाम चितु रह्यौ समाइ ॥**
**आपहिं पावक आपहिं पवना ।**
**जारै खमस त राखै कवना ॥**
**काको जरै काहि होइ हानि ।**
**नटबिधि खेलै सारंगपानि ॥**
**कहै कबीर अक्खर दुइ भाखि ।**
**होइगा खसम त लेइगा राखि ॥**

एक विशेष गोष्ट सांगायची म्हणजे ही पदे अत्यंत जुन्या बाडांतूनही आढळून येतात आणि ही पदे कबीरांचीच खरीखुरी, अस्सल पदे मानावयास कोणताही प्रत्यवाय दिसत नाही. म्हणून या तीनही घटनांमध्ये सत्याचा बराच अंश असला पाहिजे असे खात्रीने म्हणावेसे वाटते. तीन उद्धृत पदांपैकी मधील पदात ही जी ओळ आली आहे --

**"तीन बेर पतियारा लिन्हां"**

(तीन वेळा परीक्षा घेऊन पाहिली) हिच्यावरून असे स्पष्टपणे सिद्ध होऊ शकते की, कबीरदासांना तीन वेळा कठोर परीक्षा द्यावी लागली असावी. या सत्त्वपरीक्षेनंतरच संपूर्ण भारतात कबीरदासांना उदंड कीर्ती लाभली आणि त्यांचा परवर्ती संतसज्जनांवर अद्भुत प्रभाव पडला असे आम्हांस निश्चितपणे वाटते. केवळ वाणीच्या सामर्थ्यानेच कोणी माणूस इतकी लोकप्रसिद्धी प्राप्त करू शकत नाही, त्यासाठी काही चमत्कार वगैरेही करून दाखवणे आवश्यक असते. इतके मात्र नक्कीच कबूल करायला हवे की आजच्या या विसाव्या शतकात अशासारख्या दैवी चमत्कारांच्या कथांवर विश्वास ठेवणारे लोक पुष्कळच कमी आढळतील. परंतु याचबरोबर हे मान्य करणे भाग आहे की, आजवर आम्ही आमचा बराचसा आध्यात्मिक वारसा हळूहळू गमावून बसलो आहोत. कबीरदास हे एक महान

योगी आणि संतसत्पुरुष होते. त्यांच्यावर माती, पाणी, आग इत्यादींचा काहीही प्रभाव होऊ शकणे अशक्य होऊन बसावे इतपत त्यांची साधना श्रेष्ठ दर्जाची होती, असे म्हणता येईल. आजही न जाणो कितीतरी असे महात्मे असतील की जे वाघ-सिंहांच्या भूमीत निर्जन एकान्तात राहून साधना करीत असतील. त्यांचे रक्षणतरी कोण करतो? म्हणून कबीरदासांसारख्या समदर्शी महापुरुषाच्या बाबतीत सांगितल्या जाणाऱ्या वरील घटना अशक्य कोटीतीलच आहेत असे मानता येत नाही.

परंतु असे मात्र अगदी ठामपणाने सांगणे योग्य होणार नाही की कबीरदासांवर झालेले हे सर्वच अन्याय एकट्या सिकंदर लोदीनेच केले होते. कबीरदास सिकंदर लोदीच्याच शासनकाळात होऊन गेले असे मानण्यात अनेक अडचणी आहेत. संवत १५४५ पासून १५७५ पर्यंत सिकंदर लोदीने राज्य केले, आणि इतिहासकारांच्या मते तो संवत १५५१ मध्ये काशी येथे आला होता. संवत १५५१ च्याही खूप आधी म्हणजे संवत १५०५ मध्येच कबीरदासांनी आपली इहलोकीची यात्रा संपविली, हे सर्व आपण पुढे विस्ताराने पाहणाराच आहोत. तसेच, काही लोक कबीरदासांचा मृत्यू संवत १५७५ ही कल्पून चालतात. परंतु असे मानूनदेखील इतिहासातील पुराव्यांच्या आधारे कबीर आणि सिकंदर लोदीची भेट नेमकी केव्हा घडली होती हे सिद्ध करून दाखविता येत नाही. तो हिंदू प्रजेवर क्रूर अन्याय करण्यासाठी प्रसिद्ध मात्र होता. म्हणूनच कदाचित कबीरदासांचे चरित्र लिहिणाऱ्या जुन्या लेखकांनी त्यांच्यावर झालेल्या सर्व अन्यायाचे खापर सिकंदर लोदीच्या माथ्यावर फोडलेले दिसते. लोकपुरुषाची कल्पनाशक्ती काही गोष्टींचा अन्योन्यसंबंध मोठ्या गमतीदार पद्धतीने जोडून टाकीत असते. बऱ्याचशा कबीरपंथीय ग्रंथांतून तर या सिकंदर लोदीला जगज्जेत्या सिकंदरच्या पंक्तीतही नेऊन बसविण्यात आले आहे. त्या महान रणकुशल सिकंदरची एक पदवी 'जुलकरनैन' अशी आहे. या पदवीचा आपापल्या परीने अर्थ लावण्याचाही उद्योग लोकांनी केला आहे. ग्रीक लोक दोन शिंगांची टोपी घालीत असत म्हणून काही लोक त्या पदवीचा अर्थ 'दोन शिंगेवाला' असा करतात. काही लोकांच्या मते त्याने पूर्व आणि पश्चिम या दोनही दिशांवर विजय मिळविला होता म्हणून त्याला ते नाव मिळाले. तर काही जण त्याचा 'दो सितारोंवाला' किंवा भाग्यवान असाही अर्थ घेतात. पण 'कमालबोध' नावाच्या एका कबीरपंथी ग्रंथामध्ये असाही वरील उपाधीचा अर्थ 'कोष्ट्याने तयार केलेला अथवा बनविलेला' असा दिलेला आहे. अर्थ असा की, कबीर कोष्ट्याने त्याला उपदेश केला असल्यामुळेच तो 'जुलकरनैन' झाला –

**भये मुरीद जुलहा के आई ।**
**तबही जुलकरन नाम धराई ॥**

बादशाहा सिकंदर लोदीच्या घटनेमध्ये ज्या शेख तकीचा उल्लेख आला आहे त्याला बरेचसे लोक चुकीने कबीरदासांचा गुरू मानीत असत. या गैरसमजाची सुरुवात बहुधा मौलाना गुलाम 'सरवर' साहेबांच्या 'खजीनतुल असफिया' या पुस्तकातील उल्लेखानंतर झाली

असावी. या पुस्तकात एके ठिकाणी ते असे म्हणतात, "शेख कबीर हा कोष्टी शेख तकी याचा चेला होता. परमेश्वर आणि त्याचे अस्तित्व यासंबंधी सर्वप्रथम हिंदी भाषेमध्ये लिहिणारा माणूस हाच होय. समतोल धार्मिक विचारांमुळे हिंदू आणि मुसलमान या दोहोंनीही त्यास आपला पुढारी मानले. हिंदूंनी त्याला भक्त म्हटले तर मुसलमान त्याला पीर मानीत असत. त्याचा मृत्यू सन १५९४ किंवा संवत १६५१ मध्ये झाला. त्याचे गुरू शेख तकी १५७५ किंवा संवत १६३२ मध्ये मृत्यू पावले होते." या सर्व कथनावरून एक गोष्ट स्पष्ट होते. 'सरवर' साहेबांना आपल्याच कबीरदासासंबंधी सांगायचे होते. परंतु त्यांनी त्याच्या मृत्यूचा जो सन दिला आहे त्यावरून असे वाटू लागते की, त्यांना शेख कबीर नामक नंतरच्या काळात होऊन गेलेल्या कोण्या एका सूफी संताचा उल्लेख अभिप्रेत आहे. अनवधानाने त्यांनी काशीनिवासी कबीरदास आणि तो सूफी साधक यांस एकच मानून टाकलेले दिसते.

ज्या 'कबीर-बीजक' नावाच्या ग्रंथास कबीरपंथाचे लोक कबीरदासांच्या भजनांचे मूळ पुस्तक म्हणून मानतात त्यात दोन ठिकाणी या शेख तकीचा उल्लेख आला आहे. वास्तविक यावरूनच या शेख तकीचा कबीरदासांच्या चरित्रकथेत समावेश झालेला आहे. 'कबीर-बीजक' मध्ये एके ठिकाणी त्याच्या अठ्ठेचाळिसाव्या रमैनीमध्ये असे म्हटले आहे –

**मानिकपूर कबीर बसेरी । मद्दति सुनी शेख तकि केरी ।।**

याचवरून असे दिसून येते की, जेव्हा कबीरदास माणिकपूर येथे गेले होते तेव्हा त्यांनी शेख तकी नामक कोणा पुरुषाची खूप प्रशंसा ऐकली होती. यानंतर त्रेसष्टाव्या रमैनीमध्ये एक दोहा असा आढळून येतो –

**नाना नाच नचाय के, नाचै नट के भेख ।**
**घट घट अबिनासी अहे, सुनहु तकी तुक सेख ।।**

यावरून असे दिसते की, शेख तकी यास उद्देशून ते आपल्या परब्रह्माचे स्वरूप स्पष्ट करून सांगत आहेत. या दोन महापुरुषांची परस्पर भेट घडली होती, असेही वरील उदाहरणावरून दिसून येते. परंतु अलीकडे काही संशोधकांनी असे सिद्ध करून दाखविले आहे की, बीजकाचा पाठ हा कबीरदासांच्या मृत्यूनंतर बऱ्याच वर्षांनी तयार करण्यात आला. आणि यामुळे त्यात समाविष्ट असलेल्या सर्वच पदांना कबीरांची प्रामाणिक पदे मानण्याचेही कारण उरलेले नाही. यामध्ये प्रामाणिक पदांच्या जोडीलाच नंतर त्यांच्या शिष्यपरिवाराकडून पडलेली भरही मोठ्या प्रमाणात आहे. म्हणून यावरून पहिला निष्कर्ष निघतो तो असा – बीजक या ग्रंथासच केवळ प्रमाण मानून कबीरांच्या चरित्रामधील कोणतीही घटना कोणी ठामपणाने मांडू शकत नाही. दुसरीही एक गोष्ट स्पष्ट आहे ती अशी – कबीरांच्या समकालीन असणारा किंवा ज्याला त्यांचा गुरू समजावे असा कोणीही

शेख तकी नावाचा पुरुष इतिहासावरूनही आपल्याला ज्ञात होत नाही. शेख तकी या नावाने प्रसिद्ध असलेले दोन सूफी साधू मात्र आहेत. यांपैकी एक कडेमानिकपूर येथे राहणारे होते आणि दुसरे अलाहाबादेजवळच्या झूंसी गावचे राहणारे होते. यांपैकी जो पहिला शेख तकी आहे त्याचा मृत्यू कबीरदासांच्या मृत्यूनंतर सुमारे शंभर वर्षांनी झाला होता. आणि दुसऱ्याचा मृत्यू कबीरदासांच्या जन्मापूर्वी सुमारे शंभर वर्षे आधीच झाला होता. अशा परिस्थितीत या दोघांना कबीरदासांचे समकालीन मानणे कसे शक्य आहे? 'बीजक' मध्ये अंतर्भूत असलेल्या त्या रमैनींसंबंधी वर चर्चा केलीच आहे. त्यांचा समवेश बहुधा कोणीतरी पश्चात कबीरदासांच्या प्रामाणिक पदांमध्ये घुसडून देण्यामुळे झाला असावा. आणि त्या पदांना आपण प्रामाणिक मानून जरी चाललो तरी त्यांमध्ये शेख तकी हा कबीरदासांचा पीर किंवा गुरूच होता असे म्हणण्यासारखा कोणताही पुरावा आढळून येत नाही. फारतर एवढेच म्हणता येईल की, ते दोघेही एकाच काळात होऊन गेले.

काहीही असो, एवढे मात्र सांगावयास हवे की, 'निर्भय ज्ञान', 'अनुरागसागर' इत्यादी कबीरपंथी ग्रंथांमधून शेख तकी आणि कबीरदास यांच्यासंबंधीच्या बऱ्याचशा कथा देण्यात आलेल्या आहेत. शेख तकीने त्यांची एकूण बावन्न वेळा परीक्षा घेतली होती अशी एक समजूत आहे. याच परीक्षांना 'बावन कसनी' असे म्हणण्यात येते. यांपैकी काहींचा परामर्श आपण वर घेतलाच आहे. परंतु आणखी दोन अशा हकिगती आहेत, ज्यांची चर्चा येथे करणे आवश्यक वाटते. या दोन्ही हकिगती कमाल आणि कमाली यांना जिवंत करण्यासंबंधीच्या आहेत.

असे म्हणतात की, कबीरदासांनी दाखविलेले बरेचसे चमत्कार जेव्हा सिकंदर लोदीने प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनी पाहिले तेव्हा त्याची अशी खात्री पटली की, ते सिद्धी प्राप्त केलेले एक महापुरुष आहेत. आणि जेव्हा काशीहून तो दिल्लीकडे जावयास निघाला तेव्हा त्याने कबीरदासांनाही आपल्याबरोबर येण्याची विनंती केली. त्यांनी त्याची विनंती मान्य केली. सिकंदर लोदीने आपला सर्वांत सुंदर असा गजराज सजवून त्यांना स्वारीसाठी दिला. प्रयागच्या त्रिवेणी संगमापाशी फौजी आल्यावर बादशाहाने मुक्काम करण्याचा हुकूम दिला. खाणे-जेवणे आटोपल्यावर जेव्हा मंडळी बसली होती तेव्हा कबीरदास त्यांना समजुतीच्या गोष्टी सांगत होते. एवढ्यात एक घटना घडून आली. गंगेच्या प्रवाहाबरोबर एका लहान मुलाचे प्रेत पश्चिमेकडून पूर्व दिशेकडे वाहत चाललेले दिसून आले. त्या प्रेताकडे बोट दाखवून शेख तकी बादशाहास म्हणाला, "महाराज! कबीरदास तर आपण स्वतःच ईश्वर आहोत असा दावा सांगत असतात. आणि जर खरोखरीच तसे असेल तर ते या प्रेतालाही पुन्हा जिवंत करून दाखवू शकतील. जर त्यांनी असे करून दाखविले ता आम्हांलाही विश्वास वाटेल की, ते खरोखरीच ईश्वराचे अवतार आहेत." हे बोलणे ऐकल्यावर कबीरदासांनी आपला हात उंचावून त्या प्रेताला आपल्याकडे येण्यासाठी खुणेने इशारा दिला, आणि ते प्रेत अत्यंत जलद गतीने वाहत वाहत कबीरांसमोर येऊन थांबल्याचे सर्व लोकांनी पाहिले. नंतर कबीरदासांनी आपल्या परमात्म्याचे काही वेळ चिंतनमनन केले. ते म्हणाले,

"या मृत देहातील आत्मा पुन्हा येऊन या देहात समाविष्ट होवो!" आणि सर्व लोकांनी पाहिले तो काय, कबीरदसांच्या हातातून एक दिव्य ज्योती बाहेर येऊन त्या प्रेतामध्ये सामावून गेली. तो मुडदा जिवंत झाला ! आणि पाण्यातून बाहेर पडून त्याने कबीरदासांच्या चरणांवर आपले मस्तक ठेवले. हा सारा अलौकिक चमत्कार पाहून सिकंदराच्या तोंडून उद्गार निघाले – "आश्चर्य आहे ! आपण तर आज कमाल केलीत !" यावर कबीर उत्तरले, "आपण या गोष्टीस कमाल समजता. तर ठीक आहे. हा मुलगा आता याच नावाने उदंड कीर्ती प्राप्त करील."

सिकंदर बादशाहाने जेव्हा त्या मुलाच्या पूर्वजन्माची कथा ऐकण्याची जिज्ञासा व्यक्त केली तेव्हा कबीरांनी त्याच्याकडे इशारा करून म्हटले, "अरे कमाल, तू आता जरा आम्हांला तुझ्या पूर्वजन्माची गोष्टसुद्धा सांगून टाक पाहू!" त्यावर मुलगा बोलू लागला, "काही वर्षांपूर्वी उत्तर खंडातील एका ब्राह्मण कुळामध्ये मी जन्माला आलो होतो. मला एक बहीणसुद्धा होती. आमच्या पूर्वजन्मीच्या संस्कारांमुळे आम्ही हिमालयावर तपाचरण करण्याच्या हेतूने गेलो. आमच्या तपश्चर्येमुळे प्रसन्न होऊन कबीरदासांनी आम्हांला दर्शन दिले. आम्ही जेव्हा त्यांच्याकडे आत्मज्ञान देण्याविषयी प्रार्थना केली तेव्हा ते एवढेच म्हणाले, 'जेव्हा योग्य वेळ येईल, तेव्हा योग्य तेच घडून येईल.' काही दिवसांनंतर मी मृत्यू पावलो आणि माझ्या कुटुंबीयांनी मला गंगेच्या प्रवाहात फेकून दिले. आणि यापुढे काय घडले ते तर आपण आता पाहातच आहात." त्या मुलाने हेही सांगितले की, त्याला आपल्या पूर्वजन्माची स्मृती कबीरदासांच्या आशीर्वादामुळेच होऊ शकली. या सर्व घटनेमुळे शेख तकीला फार पश्चात्ताप वाटला. आणि पुढे हाच कमाल कबीरदासांचा प्रमुख शिष्य म्हणून प्रसिद्धीस आला.

बरेच लोक या कमालास कबीरांचा पुत्रच समजतात आणि त्यासाठी पुरावा म्हणून 'श्रीगुरुग्रंथसाहेब' या शिखांच्या पवित्र धर्मग्रंथातील हा दोहाही सांगत असतात –

**बूडा बंस कबीर का, उपज्यौ पूत कमाल ।**
**हरि का सुमिरन छाँड़िके, घर ले आया माल ॥**

परंतु, संतजनांमध्ये गुरूस आध्यात्मिक पिता समजले जाते. म्हणून प्रमुख शिष्यास पुत्रही म्हटले जाते. कबीरदासांचा हा कमाल नावाचा प्रमुख शिष्य न जाणो पुढे-मागे कधी घरादाराच्या मायामोहात सापडला असेल, आणि तेव्हापासून वर दिलेली म्हण प्रचारात आली असेल. शिवाय, हा दोहा वाचूनही असेच जाणवते की, कोणीतरी तिसराच माणूस कबीर आणि कमाल यांच्याविषयी काही सांगण्याचा प्रयत्न करतो आहे. पूर्वी म्हटलेच आहे त्याप्रमाणे अशा कितीतरी कविता कबीरदासांच्या नावावर मागाहून जोडण्यात आल्या आहेत. हा दोहासुद्धा असाच प्रक्षिप्त, आहे असे वाटते.

कमालीसंबंधी सांगितली जाणारी कथाही अशाच स्वरूपाची आहे. एकदा सुलतान सिकंदर लोदीचा राजदरबार भरलेला होता. कबीरदास ज्ञानोपदेश करीत होते, एवढ्यात शेख तकी यांचे राजदरबारमध्ये आगमन झाले. थोड्याच दिवसांपूर्वी त्यांची कन्या वारली असल्याने

ते फारच दु:खीकष्टी झालेले होते. त्यांनी दरबारात उभे राहून असे सांगितले की, "काही दिवसांपूर्वी गंगेच्या प्रवाहातील लहान मुलाचे जे प्रेत जिवंत करून दाखविले त्यात त्यांनी फार मोठे काही विशेष करून दाखविले असे म्हणता येत नाही. कधी कधी लोकांचे प्राण न जाताच ते बेशुद्ध पडतात. त्यांचे फक्त शरीरच बधिर झालेले असते. काही युक्ती योजून अशा मुडद्यांना सहज जिवंत करणे शक्य असते. माझी कन्या आता कबरीमध्ये गाडून टाकण्यात आली आहे. जर कबीरदासांनी तिला जिवंत करून दाखविले तर मी सदैव त्यांचा शिष्य बनून राहीन." कबीरदासांनी त्या कबरीवरील माती आणि दगड दूर करण्याची आज्ञा दिली. जेव्हा त्या मुलीचे प्रेत दिसू लागले तेव्हा त्यास उद्देशून ते म्हणाले, "शेख तकीच्या मुली, आता तू उठ!" अशा प्रकारे त्यांनी तीन वेळा म्हणूनही जेव्हा ते प्रेत जरासुद्धा हालचाल करिना, तेव्हा सर्व लोक कबीरदासांची चेष्टामस्करी करू लागले. शेवटी कबीरदासांनी जेव्हा त्या प्रेतास उद्देशून असे म्हटले – "कबीराच्या मुली, आता तू ऊठ पाहू!" तेव्हा ताबडतोब ती मुलगी उठली. तिने कबीरदासांच्या चरणांवर आपले मस्तक ठेवले. कबीरदासांनी तिचे नाव 'कमाली' असे ठेवले, आणि कमालीनेही पुढे आयुष्यभर त्यांना आपल्या पित्याप्रमाणे मानले. या घटनेनंतर शेख तकीचे हृदय पश्चात्तापाने दग्ध झाले. त्यांनी आपल्या सर्व चुका मान्य करून कबीरदासांची माफी मागितली. कमालीही शेख तकीकडे राहण्यास तयार झाली नाही. आपले सारे उर्वरित आयुष्य तिने कबीरदासांच्यापाशीच काढण्याचे ठरविले. कबीरांनीही तिचे पालनपोषण केले.

कमाल आणि कमाली यांना पुन्हा जिवंत करण्याच्या चमत्काराची ही कथा केवळ कबीरपंथीयांच्याच ग्रंथांतून मिळते असे नव्हे तर गरीबदास आदी अन्य संतांच्या काव्यांतूनही या कथांचा उल्लेख आलेला आहे. परंतु अनंतदासने मात्र आपल्या 'परचई' ग्रंथामध्ये कमाल अन् कमालीचा अजिबात उल्लेख केलेला नाही. म्हणून कदाचित धरमदासांप्रमाणेच याही बाबतीत घडले असण्याची शक्यता आहे. धरमदासांप्रमाणेच याही व्यक्ती बऱ्याच नंतरच्या काळात होऊन गेल्या असाव्यात. परंतु कबीरदासांच्या शिकवणुकीचा स्वीकार करून आचरण केल्यामुळे त्यांचीही गणना कबीरांच्या प्रमुख शिष्यांत होऊ लागली. इतके मात्र निश्चितपणे सांगता येईल की, कमाल आणि कमाली ही कबीरदासांची मुले मात्र नक्कीच नव्हती. जर ती त्यांच्या काळातच झाली असतील तर ती त्यांची अधिकात अधिक म्हणजे शिष्य आणि शिष्या असू शकतील.

पण जे लोक कमाल आणि कमाली यांना कबीरदासांचाच मुलगा व मुलगी मानतात, ते त्यांच्या विवाहासंबंधीच्या गोष्टीही सांगत असतात. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे लोई नावाच्या कोणा एका स्त्रीबरोबर कबीरांचे लग्न झाले, आणि कमाल आणि कमाली ही त्या दोहोंची संतती होय. या लोईचा आणि कबीरांचा संबंध कसा जुळून आला, यासंबंधीही एक मनोरंजक कथा सांगितली जाते. गंगेच्या पैलतीरी एकान्तवासात कोणी एक वनवासी महात्मा राहत असे. ते एकदा गंगाकिनारी स्नानास गेले. पाहतात तो काय, कांबळ्यामध्ये गुंडाळलेल्या स्थितीत एक मुलगी गंगामाईच्या प्रवाहाबरोबर वाहत चालली होती. त्या महात्म्याला तिची

दया आली. त्यांनी तिला प्रवाहाबरोबर काढून आपल्या कुटीमध्ये नेले. तेथेच तिचे पालनपोषण केले. ही मुलगी लोईत म्हणजे कांबळ्यात गुंडाळलेली होती म्हणून त्यांनी तिचे नावही लोई असेच ठेविले. ती मोठी झाल्यानंतरचा एक प्रसंग. एकदा कबीरदास हिंडतफिरत त्या भागामध्ये पोहोचले. थोड्याच वेळात आणखीही दोनचार महापुरुष तेथे जमले. वनवासी साधुमहाराज त्यावेळी कोठेतरी बाहेर गेलेले होते. म्हणून लोईनेच या सर्व पाहुण्यांचे स्वागत केले. ती त्या सर्वांना आपल्या झोपडीत घेऊन गेली आणि त्यांना तिने एक एक प्याला दूध प्राशन करण्यास दिले. पण कबीरदासांनी आपल्या वाटणीचे दूध न पिता तसेच ठेवून दिले. जेव्हा त्या मुलीने त्यांना दूध न पिण्यासंबंधी विचारणा केली, तेव्हा ते म्हणाले, "मी 'शब्दा'चेच भोजन करतो. हे दूध मी अशासाठी ठेवले आहे की, याच वेळी दुसरेही एक साधुमहाराज गंगा पार करून या ठिकाणी येत आहेत." आणि थोड्याच वेळात एक साधुपुरुष खरोखरीच तेथे आला. हे पाहून सर्व मंडळींना मोठे आश्चर्य वाटले. कबीरदासांची ही दिव्य दृष्टी आणि दैवी चमत्कार करण्याची शक्ती पाहून ती मुलगी त्यांच्यावर मुग्ध झाली; आणि ते जेव्हा तेथून परत जाऊ लागले तेव्हा तिनेही त्यांच्याबरोबर स्वतःस नेण्याविषयी त्यांना विनंती केली. कबीरदासांनी तिला घेऊन जाण्याचे मान्य केले. पुढे याच मुलीने त्यांच्याबरोबर लग्नही केले आणि ती त्यांची धर्मपत्नी बनून त्यांची सेवा करू लागली.

काही कबीरपंथी ग्रंथांतून असेही म्हटले आहे की, लोई ही त्यांची खरी पत्नी नसून शिष्या होती. त्यांच्या म्हणण्याप्रमाणे वनवासी साधुमहाराजांची जेव्हा शेवटची वेळ येऊन ठेपली तेव्हा त्यांनी लोईला आपल्याजवळ बोलावून घेऊन म्हटले, "मुली, आता मी तुला सोडून जाणार आहे, काही दिवसांनी एक महापुरुष येथे येतील, तो तुझ्या सर्व प्रश्नांची उत्तरे एकाच प्रकारची देत राहील. जोवर ते येऊन तुला घेऊन जात नाहीत तोवर तू येथे राहा." एवढे बोलून होताच त्यांचे प्राण पंचतत्त्वात विलीन झाले. लोई त्या जंगलात एकटीच राहू लागली. जो कोणी साधू महात्मा त्या भागातून जात असे त्याला ती त्याचे नाव, जात, पंथ इत्यादींविषयी विचारीत असे. अशाच प्रकारे काही दिवस निघून गेले. एके दिवशी दोन महापुरुष तिच्या झोपडीजवळ आले. लोईने त्यांचे स्वागत करून त्यांचे आदरातिथ्य केले. त्यांना द्रोणातून दूध आणून दिले. एका साधूने दूध पिऊन टाकले. पण दुसऱ्याने न पिता असे सांगितले की, एवढ्यातच दुसरे एक साधुपुरुष येथे येतील, त्यांच्यासाठी हे दूध ठेवून द्यावे. लोईला जरा आश्चर्यच वाटले. तिने त्या साधुपुरुषास त्याचे नाव विचारले, उत्तर मिळाले, 'कबीर.' लोईने त्याच्या जातीसंबंधी प्रश्न केला तेव्हा उत्तर मिळाले 'कबीर.' जेव्हा तिने तिसऱ्यांदा त्यास त्याच्या पंथाविषयी विचारले तेव्हाही त्याने उत्तर दिले, 'कबीर.' लोईला वनवासी साधुमहाराजांनी सांगितलेली गोष्ट आठवली. तिने कबीरदासांना विनंती केली, "महाराज, आपण मला आपल्या चरणी आश्रय द्यावा." कबीर म्हणाले, "चल मुली, परमेश्वराचे भजनचिंतन कर."

परंतु लोईच्या गोष्टीचा हा जो सारा सविस्तर आराखडा तयार केलेला आहे त्यात मुळातच एक चूक झालेली दिसून येते. वास्तविक, आपल्या काही पदांमधून कबीरदासांनी या लोई शब्दाचा एका वेगळ्याच अर्थाने उपयोग केलेला आहे. लोक तो अर्थ नीटसा समजू शकले नाहीत आणि मनाला वाटेल तशी कथा त्यांनी तयार करून टाकलेली दिसते. कबिराने "सुनी रे लोई" किंवा "सुनो नर लोई" अशांसारखी संबोधने आपल्या अनेक पदांतून योजिली आहेत. उदाहरणार्थ,

**कहत कबीर सुनहु रे लोई,**
**हम न किसी के न हमरा कोई ॥**

अथवा

**जेहि तहित कै राखा सब लोई,**
**सा सयान बाचा नहिं कोई ॥**

अथवा

**कहत कबीर सुनहु रे लोई,**
**भरमि परौ जनि कोई ॥**

वास्तविक, संस्कृतातील 'लोक' शब्द पुढे काही काळानंतर 'लोय' अथवा 'लोई' बनला आणि आजही हिंदीत त्याचे 'लोग' असे रूप बनलेले आहे. कबीरदासांच्या काळी जे म्हटले जात असे – "सुनो रे लोई," त्याचे आजकालच्या हिंदी भाषेत सरळ रूपांतर असे होईल – "सुनो रे लोगो।" अर्थात "लोकहो, ऐका!" लोकांना वाटले की, हे कोण्या एका बाईचेच नाव दिसते आहे. आणि मग कोणीतरी वेडगळ विचाराच्या व्यक्तीने एक झकासपैकी कथा त्या लोईच्या नावाने रचून टाकली! केव्हातरी कबीरपंथी मंडळींच्या जेव्हा हे ध्यानात आले असेल की, कबीरदासांच्या बाबतीत हा भलताच अन्याय घडतो आहे, तेव्हा त्यांनी या कथेत काही फेरबदल करण्याचा प्रयत्न केला असला पाहिजे. लोई ही कबीरांची पत्नी नसून शिष्या होती असे मानले जाण्याच्या दृष्टीने हा प्रयत्न होता. तसे पाहता, या घटनेची चर्चा अनंतदासाने आपल्या 'परचई' ग्रंथातही केलेली नाही, किंवा कोणत्या दुसऱ्या प्राचीन चरित्रांतही लोईचा उल्लेख नाही. कबीरदासांची म्हणून जी प्रामाणिक पदरचना निश्चित करण्यात आली आहे, तीमध्ये कोठेही 'लोई' या शब्दाचा प्रयोग पत्नीच्या अर्थाने किंवा कोण्या दुसऱ्या स्त्रीच्या अर्थानेही करण्यात आलेला नाही.

काही लोक तर असेही मानत असतात की, या 'लोई' खेरीज आणखीही एक पत्नी कबीरदासांना होती. तिचे नाव 'धनिया' असे होते. कधी कधी लोक तिला 'रमजनियाँ' असेही म्हणत असत. या बाबतीत प्रकार असा आहे – शिखांच्या 'श्रीगुरुग्रंथसाहेब' या

पवित्र धर्मग्रंथामध्ये कबीरदासांच्या काही पदांचा संग्रह केलेला आहे. आणि त्यातील दोन पदे अशा स्वरूपाचीही आहेत –

पहिले पद –

**मेरी बहुरिया को धनिया नाउ ।**
**ले राखिओ रामजनिआ नाउ ॥**
**इन्ह मुंडिअन मेरा घर धुंधरावा ।**
**बिटवहि राम रमऊआ लावा ॥**
**कहतु कबीर सुनहु मेरी माई ।**
**इन मुंडिअन मेरी जाति गंवाई ॥**

दुसरे पद –

**पहिली कुरुपि कुजाति कुलखनी साहुरै पेईऐ बुरी ।**
**अब की सरूपि सुजानि सुलखनी सहजे उदरि धरी ॥**
**भली सरी मुई मेरी पहिली बरी ।**
**जगु जगु जीवउ मेरी अब की धरी ॥**
**कहु कबीर जब लहुरी आई बड़ी का सुहाग टरिओ ।**
**लहुरी संगि मई अब मेरै जेठी अउरु धरिओ ॥**

यांपैकी पहिल्या पदाच्या प्रथम चार ओळी कबीरदासांच्या आईने म्हटल्याप्रमाणे आहेत. तेथे ती त्रस्त होऊन म्हणते आहे – "माझ्या सुनेचे नाव चांगले 'धनिया' असे होते. तिला हे जळले मेले साधू 'रामजनियाँ' काय म्हणत असतात? ह्यांनीच आमचे सारे घर धुळीला मिळविले आहे..... इत्यादी." पुढच्या दोन ओळींमध्ये कबीरदास दुसरे उत्तर देत आहेत. जर हे पद कबीरांनीच लिहिलेले आहे असे आपण मान्य केले तर मग नक्कीच असे समजून चालायला हवे की, त्यांचा विवाह झालेला होता. परंतु आपणांस असे आढळून येते की, 'गुरुग्रंथसाहेबा'मध्येही अशाच अनेक पदांचा आणि दोह्यांचा भरणा आहे की, ज्यांचे कर्तृत्व कबीरांचेच आहे आहे असे मानता येत नाही! खरे सांगायचे तर कबीरदास लिहिण्यावाचण्यावर फारसा विश्वास ठेवणारे संत नव्हते. म्हणून त्यांची वाणी क्रमबद्ध स्वरूपात लिहून तयार होऊ शकली नाही. सर्वस्वी त्यांच्याच काळात लिहून ठेवलेले आणि त्यांची सर्व पदे एकत्र असलेले असे मूळ पाठांचे हस्तलिखित प्राप्त होत नाही. आणि ज्या काही पोथ्या उपलब्ध आहेत, त्यांतही थोडीबहुत का होईना सरमिसळ झालेली आहेच. म्हणूनच कदाचित अशी एक म्हण रूढ झालेली आहे –

**कुछ-कुछ कही कबीरदास,**
**और कही सब संतन ।**

"थोडे थोडे कबीराने सांगितले, तेच घेऊन पुढे अन्य संतांनी सांगणे सुरू ठेविले." यामुळेच वरील पद नेमके कबीरांचेच आहे की ते कोणा दुसऱ्याच वाङ्मयचौर्य करणाऱ्या संताचे आहे, असा खरा प्रश्न आहे. शेकडो हस्तलिखिते आणि छापील पोथ्यांचा अभ्यास बारकाईने करून मी कबीरदासांच्या प्रामाणिक काव्यरचनेचा शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे. आणि 'कबीर-ग्रंथावली' या नावाने तो ग्रंथही मुद्रित झाला आहे. त्यात वरील दोन पदांचा अंतर्भाव करता आला नाही. म्हणून असे वाटते की, ही पदे नंतरच्या काळातच कोणीतरी कबीरदासांच्या नावावर घुसडून दिलेली असावीत. दुसऱ्या पदात तर वास्तविक त्यांनी कुबुद्धी आणि सुबुद्धी यांवर रूपक केलेले आहे. कधी कधी कबीरदास उच्च विचार असेच उपहासात्मक शैलीत सांगून जातात. या पदांचा काही व्यंग्यार्थ अभिप्रेत असतो; आणि त्यांचा नेमका अर्थ लावण्यात एखादी चूक होण्याची शक्यता असते. कबीरांनी स्वतःच आपल्या विवाहासंबंधी उल्लेख केलेला आहे असे काही जण म्हणतात. त्याच्या मुळाशी असाच एक प्रक्षिप्त दोहा आहे. तो दोहा असा –

**नारी तो हम भी करी, बूझा नहीं विचार ।**
**जब जानी तब परहरी, नारी बड़ा बिकार ॥**

हा दोहा निश्चितच प्रक्षिप्त स्वरूपाचा आहे. कारण तो कबीरदासांच्या प्रामाणिक समजल्या जाणाऱ्या रचनेमध्ये अंतर्भूत नाही. पण त्यांचे एक खरेखुरे स्वरचित पद मात्र असे आहे की ज्यात ते म्हणतात –

**मुसि मुसि रोवै कबीर की माइ ।**
**यह बारिक कैसे जीवहि खुदाइ ॥**
**कहै कबीर सुनहु मेरी माई ।**
**पूरनहारा त्रिभुवनराई ॥**

'यह बारिक कैसे जीवहि खुदाई' चा अर्थ असासुद्धा लावता येऊ शकेल की, कबीरदासांचेच एखादे मूल आहे; आणि त्यासाठी त्यांची आई काळजीत पडली आहे. "देवा! आता हे मूल कसे जगायचे!" (कारण कबीरांनी कामधाम सोडून ईश्वराची भक्ती आरंभिलेली होती.) परंतु या ओळींचा खरा अर्थ असा नाही. कबीरांची आई येथे स्वतः त्यांच्याच बाबतीत काळजी करीत आहे, असा येथे वास्तविक अर्थ अभिप्रेत आहे. पुत्र कितीही मोठा झाला तरी त्याची आई त्याला आपले लहान 'मूल'च मानत असते.

या सर्व चर्चेचे तात्पर्य एवढेच आहे की, कबीरदास गृहस्थाश्रमी जरूर राहत होते. परंतु, त्यांचा विवाह झाला होता आणि त्यांना मुलेबाळेही होती असे निश्चित म्हणण्याएवढा भक्कम पुरावा आजतरी उपलब्ध झालेला नाही.

एकीकडे काही लोक त्यांच्या विवाहादीबद्दल नाना प्रकारच्या गोष्टी सांगत असतात, तर दुसरीकडे त्यांचे अखंड ब्रह्मचर्य सिद्ध करणारी एक कथा भक्तमंडळांमध्ये प्रसिद्धी पावलेली आहे. एकदा भगवंताने कबीरदासांची सत्त्वपरीक्षा पाहावयासाठी स्वर्गातून एक अप्सरा पाठवायचा बेत केला. त्या अप्सरेस त्यांनी सांगितले, "काशी गावामध्ये कबीरदास नावाचा माझा एक मोठा भक्त राहत असतो. तो तुझ्या मोहात फसतो की नाही ते जरा तू जाऊन पाहून ये पाहू!" ती अप्सरा सोळा शृंगार करून अशी काही नटूनथटून निघाली की जणूकाही शुकदेवाला भुरळ पाडण्यासाठी रंभाच निघाली असावी. तिच्या बोलण्यात साक्षात अमृताचे माधुर्य होते. तिचे रूप तर असे मादक होते की प्रत्यक्ष ब्रह्मदेवाची तपस्या भंग पावावी! मग माणसाची काय कथा! ती साधे चालत असतानासुद्धा वाटायचे जसे नृत्याचे मनोहर दर्शन घडते आहे! ती ज्याच्याकडे म्हणून कटाक्ष टाकीत असे त्याला मदनाची बाधा झाल्याशिवाय काही राहत नसे!

कबीरांपाशी येऊन ती अप्सरा म्हणाली, "अशी तुम्ही आपली नजर वळवू नका. जरा माझे रूप तर पहा! या रूपाची कृपा व्हावी म्हणून तिकडे लोक मोठीथोरली तपश्चर्या करीत आहेत. लोक हिमालयात बसून तपःसाधना करतात. काशीला येऊन मुक्ती मिळविण्यासाठी स्वतःचा अंत करून घेतात. परंतु इतके करूनही ते मला काही प्राप्त करून घेऊ शकत नाहीत. म्हणून मी ही तुमच्यासमोर सहजच येऊन उभी राहिले आहे. माझ्याबरोबर सुखाचा उपभोग घ्या, नाही तर ही सारी तपश्चर्या वाया जाईल."

कबीरदास म्हणाले, "हे माते, ऐक! स्वर्गलोकात तुला असे कोणते दुःख भोगावे लागले म्हणून तू येथे आली आहेस बरे? माझी ही अशी कोष्ट्याची जात आणि धंदाही काही चालतो असे नाही. तू आपली राजकुमारांपाशी जा. तिथे अगर आणि कस्तुरीच्या मोहक सुगंधाने सारे घर दरवळलेले असते. माझे म्हणशील तर मी असा फत्तरासारखा आहे. कधी मला पाझर फुटायचा नाही. माझ्याजवळ बसलीस तर तूच लाजेने चूर होऊन जाशील. तुझ्या दृष्टीत मला स्पष्ट विष दिसते आहे. माझे प्राण तर ईश्वराशी एकरूप झालेले आहेत. इथे तुला जागा आहे कुठे? म्हणून म्हणतो, हे माते, मला तू क्षमा कर, आणि माझा नाद सोडून दे. जिथून आलीस तिथे परत निघून जा. स्वर्गलोक काय रिकामा पडला आहे, म्हणून तू माझ्याकडे आलीस?"

जेव्हा सर्व प्रयत्न करून ती अप्सरा शेवटी हरली तेव्हा पुन्हा भगवंतापाशी जाऊन त्याला घडलेली सगळी हकिगत सांगून ती म्हणली, "एक वेळ सूर्य कदाचित पश्चिम दिशेस उगवू शकेल, पण कबीराचे मन मात्र कधीही विचलित होणार नाही. मायामोहापासून इतका अलिप्त असलेला दुसरा विरक्त माणूस कोठेही आढळणार नाही." हे सारे ऐकून भगवंत प्रसन्न झाला आणि स्वतःच येऊन कबीरांसमोर प्रकट झाला. त्याच्या दर्शनाने कबीरांचे नेत्र सुखावले. भगवंत म्हणाला, "भक्ता! तुझी जी काही इच्छा असेल ती सांग. तू मागशील ते मी तुला देईन. तू म्हणशील तर तुझ्या शिरावर छत्र धारण करीन. म्हणशील तर

आठही सिद्धी आणि नऊ निधी तुला देऊन टाकीन. तू म्हणालास तर साऱ्या पृथ्वीचे राज्य तुझ्या स्वाधीन करतो."

कबीरदासांनी भगवंतास सांगितले, "हे त्रिभुवनराया, मला काहीही नको आहे. माझ्या या छोट्याशा बुद्धीला काही सुचतच नाही. मुंगी काय पर्वत उचलू शकेल? तारे कसे चंद्रास लपवू शकतील? एका ओंजळीत सागर थोडाच सामावणार आहे? गूळ आणि विष यांमधील फरकही ज्याला कळत नाही अशा अजाण बालकासारखा मी मंदमतीचा आहे. बरे-वाईट मी काय जाणू शकतो?"

हे सर्व ऐकून भगवंताला फार आनंद वाटला. त्यांनी कबीरांच्या शिरावर आपला हात ठेवला आणि त्यांना कायमचे अजरामर करून स्वतः स्वर्गलोकाकडे प्रयाण केले. इतक्या स्थितप्रज्ञ अवस्थेप्रत पोहोचलेला तो कबीरदास धन्य होय!

ह्या कथेविषयी अधिक काही सांगण्याची आवश्यकता नाही. प्रत्येक भक्ताच्या चरित्राशी अशा प्रकारची कथा जोडण्यात आलेली असतेच. अशा तऱ्हेच्या कथांचा अर्थ केवळ एवढाच घ्यावयास हवा की, भगवंताच्या भक्तिभावात जो खरोखरीच रमून गेला, त्याला भौतिक जगातील मोठ्यात मोठ्या सुखाचेही आकर्षण असे राहत नाही.

कबीरदास आपल्या सिद्धान्ताचा प्रचार निश्चित करीत असत. परंतु, त्यांनी आपल्या नावाने स्वतंत्र असा कोणता पंथ चालविला होता अशी शक्यता वाटत नाही. सध्या कबीरपंथीयांच्या अनेक गाद्या किंवा मठ देशाच्या कोनाकोपऱ्यांतून विखुरलेले आहेत. आणि त्यांच्या काही खास अशा शाखा आणि उपशाखाही आहेत. या सर्व शाखांचा प्रारंभ करणाऱ्या व्यक्तींच्या संबंधी अशी सामान्य समजूत आहे की, त्या व्यक्ती कबीरांचे स्वतःचे शिष्य होते. कबीरपंथाची छत्तीसगड येथील शाखा धर्मदास नामक साधुपुरुषापासून सुरू झाली आहे. या शाखेच्या कबीरपंथीयांचा असा विश्वास आहे की, कबीरदासांनी शरीर-त्याग केल्यानंतर ते बांधवगड येथे पुनश्च प्रकट झाले आणि त्यांनी धर्मदास यास उपदेश देऊन आपला पंथ सुरू करण्याची आज्ञा दिली होती. यावरून असे अगदी स्पष्टपणे म्हणता येते की, जरी त्यांनी आपल्या पंथाचे नामकरण कबीरपंथ असे केले होते तरी त्यांनी आपला पंथ कबीरदासांच्या मृत्यूनंतरच चालविला होता. याचप्रमाणे बिहार प्रांतातील सारन जिल्ह्यामध्ये धनौती येथे जो एक कबीरपंथी मठ आहे त्याचा प्रारंभ करणारे भगवानदास हे मानले जातात. ते नित्य कबीरदासांबरोबर वावरत असत आणि त्यांची भजने आदी उतरून घेत असत असे त्यांच्या बाबतीत सांगण्यात येते. त्यांनी लिहून घेतलेल्यांपैकी ६०० वचनांचा एक संग्रह त्यांनी स्वतःसाठी तयार केला होता. हाच संग्रह पुढे 'बीजक' या नावाने प्रसिद्धी पावला आहे. परंतु त्यांच्याही बाबतीत ते कबीरदासांच्या काळी निश्चित विद्यमान होते हे सांगणे मोठे कठीण आहे. काशीच्या कबीरचौरा मठाचे सर्वप्रथम महंत सुरतगोपालसाहेब यांच्या बाबतीतही असेच म्हणता येईल. संत कमालच्या बाबतीत असे सांगितले जाते की, त्याला लोकांनी खूप सांगूनसवरूनसुद्धा त्याने कबीरदासांच्या नावाने कोणताही पंथ सुरू केला नाही. आपल्या स्वतःच्या नावानेही एखादा पंथ सुरू करण्याची त्याला आवश्यकता वाटली नाही. खरे सांगायचे म्हणजे, स्वतः कबीरांनीच पंथ इत्यादींची

कठोर टीका केलेली आहे. ते तर कष्ट करून साधेसुधेपणाने जीवन जगण्याचा आग्रहपूर्वक उपदेश करीत असत. यास्तव कमाल यालाच त्यांचा सर्वांत जुना शिष्य समजावयास हवा. तो बराच जुना असल्यामुळेच त्याच्या जीवनाविषयी आपल्याला फारशी माहितीही उपलब्ध नाही. कमालीसंबंधी पूर्वी सर्व विवेचन आलेले आहेच. याशिवाय पद्मनाभ, तत्त्वा, जीवा, ज्ञानी, जागूदास, रामकृपाल इत्यादीसुद्धा त्यांचे शिष्य गणले जातात. परंतु, हे सर्व लोक जरी त्यांचा उपदेश मानून जगणारे होते, तरीसुद्धा कबीराच्या काळात यांच्यापैकी बहुधा कोणीच झाला नसावा.

कबीरदास स्वतः शिकलेसवरलेले नव्हते, हे त्यांच्या बाबतीत सर्वश्रुतच आहे. 'बीजक' या ग्रंथात एक अशी साखी आहे की जिच्यावरून ह्या गोष्टीस सबळ पुष्टी मिळते. ती साखी (दोहा) अशी आहे —

**मसि कागद छूयो नही, कलम गही नहिं हाथ ।**
**चारिउ जुगन महातम कबीर, मुखहिं जनाई बात ॥**

एखाद्या शाळेत नियमितपणाने त्यांचे शिक्षण झाले नव्हते एवढे आपल्याला मान्य करता येईल, परंतु कमीतकमी त्यांना अक्षरओळख असलीच पाहिजे. पूर्वसंस्कार आणि काही संतसंगती प्राप्त झाल्यामुळे त्यांना धर्म आणि साधना यांची चांगली माहिती प्राप्त होती. वेद, उपनिषद, गीता, भागवत इत्यादी ग्रंथांतील ठळक घटना तर त्यांना ठाऊक झाल्याच होत्या. शिवाय सिद्ध आणि गोरखनाथपंथी योगी यांच्याकडून आचरल्या जाणाऱ्या साधनेचा तर त्यांनी सूक्ष्म अभ्यास केला होता. त्या योग्यांच्या बारीकसारीक गोष्टींचीही त्यांना पूर्णपणे जाणीव होती. याबरोबरच शैव, शाक्त आणि जैन आदी धर्ममतांतील विशेष महत्त्वाच्या गोष्टींना ते मान देत असत. इकडे मुसलमानी धर्माच्या गुणदोषांविषयी त्यांना अक्षरअन्‌अक्षर ठाऊक होते. परंतु या सर्व विचारांपैकी कोणत्याही एकाच एक विचाराचा डोळे झाकून ते पाठपुरावा करीत नाहीत हे त्यांचे सर्वांत मोठे वैशिष्ट्य होय. प्रत्येक गोष्ट नीट समजून अन् पारखून घेण्याचा, वैचारिक पाचपेच सोडविण्याचा, त्यांचा अगदी स्वतःचा असा एक स्वतंत्र मार्ग असे. आणि त्यातच त्यांचे वेगळेपण सामावलेले असे. त्यांच्या ठायी जबरदस्त मौलिक प्रतिभा होती. म्हणून त्यांनी अत्यंत विचारपूर्वक आपल्या निर्गुण भक्तीचा एक नवाच मार्ग शोधून काढला. त्यात ईश्वरप्रेम आणि ईश्वरविरह या कल्पनांना फार मोठे स्थान देण्यात आले. बाह्य अवडंबरावर विलक्षण कोरडे ओढण्यात आले व अशा गोष्टींपासून मनाला परावृत्त करण्याची एक अद्भुत यौगिक प्रक्रिया सांगण्यात आली होती (हीच प्रक्रिया 'सुरतियोग' या नावाने एक नवाच योग म्हणून मान्यताही पावली.) आणि पांडित्यप्रदर्शन व तत्सम इतर बाह्य अवडंबरे सोडून अगदी साधेपणे जीवन व्यतीत करण्यावर जोर देण्यात आला.

आपले सिद्धान्त त्यांनी आपल्या वाणीतून व्यक्त केले आहेत. पण दुर्दैवाने त्यांच्या काव्यरचनेवर इतरांनी आपले हात फिरविल्यामुळे आज एक मोठी चमत्कारिक स्थिती निर्माण

झाली आहे. त्यांची स्वतःची मूळची रचना कोणती याचा मागोवा घेणे त्यामुळे दुष्कर होऊन बसले आहे. कारण असे की, स्वतः कबीरदासांचा पोथ्या वगैरेंवर विश्वास नव्हता. त्यामुळे आपली कविता लिहून-टिपून ठेवण्याचा प्रश्न त्यांच्या मनाला कधी शिवला नाही. आणि दुसरा कोणी नंतर याप्रमाणे काही करील असेही त्यांना वाटले नाही. फक्त भगवानसाहेबच आपल्या वाणीचा एका छोट्याशा चोपडीवर उतारा करून ठेवीत असत. याच संग्रहाला पुढे 'बीजक' असे नाव देण्यात आले आहे. परंतु या ग्रंथाचे अवलोकन केल्यावर असे नक्कीच जाणवते की, याला जी अत्यंत प्राचीन म्हणून मान्यता आहे ती काही तितकीशी बरोबर नाही. परंतु कबीरदासांच्या पदरचनेपैकी 'बीजक'च प्रथम मुद्रित स्वरूपात बाहेर येऊ शकले. आजवर हे सुमारे तीसचाळीस ठिकाणांहून प्रकाशित केले गेले असून याच्या कित्येक आवृत्त्या संपून गेल्या आहेत. याचे खरे कारण असे आहे की, कबीरपंथाचे लोक याच ग्रंथास आपला धर्मग्रंथ मानीत असतात.

कबीरदासांची मूळ वाणी कोणत्याही प्रकारची सरमिसळ न होता याच एका ग्रंथामध्ये सुरक्षित राहिली आहे, असा त्यांचा दृढ विश्वास आहे. परंतु आज जेवढी म्हणून कबीरदासांच्या काव्याची पुस्तके उपलब्ध आहेत यांतील कोणत्याही एका पुस्तकास पूर्णपणे प्रामाणिक मानता येणार नाही, ही वस्तुस्थिती आहे. खरे पाहता, कबीरदासांच्या वेळी अथवा त्यानंतर सर्वांत आधी जी त्यांच्या काव्याची मूळ पोथी म्हणून तयार करण्यात आली असेल, ती आतातरी कोठे उपलब्ध होत नाही. याचाच परिणाम असा झाला आहे की, आज त्यांच्या काव्याच्या जितक्या म्हणून पोथ्या उपलब्ध होतात त्यांमध्ये क्रमबद्धता, पाठभेद, काव्यसंख्या इत्यादी सर्व बाबतींत बरीच परस्पर-भिन्नता दिसून येते. 'श्रीगुरुग्रंथसाहेब' हा शिखांचा अत्यंत पवित्र धर्मग्रंथ, संतसाहित्याचा एक फार मोठा महत्त्वाचा संग्रह-ग्रंथ असून तो शिखांचे पाचवे गुरू श्री अर्जुनदेव यांनी विक्रम संवत १६६१ मध्ये तयार करविला होता. यामध्ये शीख धर्मगुरूंच्या व्यतिरिक्त अन्य संतांची वाणीही संकलित करण्यात आलेली आहे. कबीरदासांचीदेखील सुमारे सव्वादोनशे पदे आणि अडीचशे श्लोक किंवा दोहे यांत संगृहित केलेले आहेत. 'ग्रंथसाहेबा'मध्ये आपल्या गुरूंच्या आत्म्याचा निवास आहे अशी शीख बांधवांची श्रद्धा असल्यामुळे त्याची दुसरी प्रत उतरवितांना किंवा त्याची छपाई करताना मूळ ग्रंथात कानामात्रेचासुद्धा फरक पडता कामा नये असा त्यांचा कटाक्ष असतो. याचा सुपरिणाम असा झाला आहे की, फार पुरातन काळापासून या ग्रंथातील मूळ पाठांमध्ये थोडादेखील बदल घडून आलेला नाही आणि तो मूळ पाठ जसाच्या तसा सुरक्षित राहिला आहे असे निश्चितपणे मानता येईल. परंतु यात कबीरदासांचे काव्य ज्या पोथीतून संग्रहित करण्यात आले त्या पोथीच्या पाठातच आधीपासून काही प्रक्षिप्त अंश समाविष्ट झाला असल्याचीही शक्यता आहे. काहीही असो, या संकलनामध्येदेखील संशयास्पद अशा बऱ्याच गोष्टी शिल्लक आहेतच; आणि म्हणूनच हा पाठही जसाच्या तसा प्रामाणिक म्हणून मान्य करता येत नाही. याचप्रमाणे अन्य आणखी काही पंथांच्या संग्रहांतूनही कबीरदासांची वाणी एकत्रित केल्याचे आढळून येते; कारण संतांच्या सर्व संप्रदायांमध्ये

त्यांना अत्यंत आदराचे स्थान प्राप्त झाले आहे. त्यांपैकी एकाचा येथे उल्लेख करणे क्रमप्राप्तच आहे. राजस्थानात आजकाल दादूपंथाचा फारच व्यापक प्रभाव दिसून येतो. पूर्वीतर हा प्रभाव याहूनही अधिक प्रमाणात होता. या पंथामध्ये पाच महापुरुषांच्या वाणी एकाच पोथीमध्ये एकत्र करून 'पंचवाणी' या नावाने तिचा पाठ होतो, आणि नित्य पूजा-आरती इत्यादीसुद्धा केली जाते. या 'पंचवाणी'मध्ये दादूजी, कबीरदास, संत नामदेव, संत रोहिदास आणि संत हरदास या पाच महापुरुषांची वाणी याच क्रमाने संग्रहित केलेली आहे. यात कबीरदासांची अधिकाधिक चारशे पदे, सुमारे आठशे साख्या अथवा दोहे आणि रमैनी किंवा चौपाया एकत्रित स्वरूपात आहेत. 'कबीर-ग्रंथावली' या नावाचे अशाच प्रकारचे एक संपादन काशी नागरी प्रचारिणी सभा या संस्थेच्या वतीने प्रकाशित करण्यात आले होते. या व्यतिरिक्त सीमाबाग, बडोदा येथील कबीर प्रेसमार्फत, मुंबईच्या व्यंकटेश्वर छापखान्यामार्फत आणि अन्य काही छापखान्यांकडूनही त्यांच्या केवळ साख्याच छापण्यात आल्या आहेत. अलाहाबाद येथील वेलवेडियर प्रेस आणि काशीचा कबीर चौरा हा मठ यांच्या वतीनेही 'शब्दावली' या नावाने कबीरदासांची पदेच केवळ एकत्रित करून छापली गेली आहेत. शांतिनिकेतनमधील आचार्य क्षितिमोहन सेन यांनी स्वतः गावोगाव भटकून अनेक संतांच्या मुखांतून प्रत्यक्ष श्रवण करून अनेक पदे जमविली आणि ती तेथूनच एकूण चार भागांमध्ये विभागून छापली आहेत. याच संकलनातील शंभर पदांचा इंग्रजी अनुवाद कविवर रवींद्रनाथांच्या प्रेरणेने प्रकाशित होऊ शकला. यामुळे पश्चिमेकडील देशांतूनही कबीरदासांच्या वाणीचा प्रचार होण्यास मदत झाली. स्वतः रवींद्रनाथांवरही कबीरदासांच्या वाणीचा खोलवर प्रभाव पडलेला होता.

परंतु, यापूर्वीच म्हटले आहे त्याप्रमाणे या सर्व प्रकाशित पुस्तकांमध्ये बराच परस्पर वेगळेपणा आढळून येतो. त्यामुळे प्रश्न असा उपस्थित होतो की, त्या महापुरुषाची मूळ काव्यरचना किती आणि कशा प्रकारची होती? कारण खरेतर केवळ या प्रश्नाचे पूर्ण उत्तर मिळाल्यावरच आपण त्यांचे यथार्थपणे मूल्यमापन करू शकतो. मी नेमका हाच दृष्टिकोन पुढे ठेवून आपले संशोधनाचे काम सुरू केले आणि अशाच हस्तलिखित प्रतींमधून आणि छापील पुस्तकांतून कबीरदासांची एकूण सुमारे सोळाशे पदे, साडेचार हजार साख्या आणि एकशेचौतीस चौपाया एकत्रित केल्या. आता प्रश्न असा होता की, काय ही सर्व काव्यरचना त्यांचीच म्हणून मान्य करावी? कबीरपंथीयांचा तर असा विश्वासच आहे की सद्गुरूंची काव्यसंपदा अनंत आहे आणि तिचे अवगाहन करणे केवळ अशक्यच आहे! झाडांची जितकी पाने आहेत, गंगामाईच्या प्रवाहात जितके म्हणून रेतीचे कण आहेत, तितकी सद्गुरू कबीरदासांची वाणी अगाध आहे. यथा—

**जेते पत्र बनसपती, औ गंगा की रैन ।**
**पंडित बिचारा क्या कहै, कबीर कही मुख बैन ॥**

कबीरदासांच्या मुखातून शब्द तर अनेक प्रसृत झाले असतील. परंतु, त्यांच्या काव्याची जी पहिली पोथी म्हणून तयार झाली असेल, तिच्या अधिकाधिक जवळ जावे, एवढाच प्रयत्न आम्ही या पोथ्यांचा विचार करून करणे शक्य आहे; कारण या सर्व पोथ्या त्याच मूळ पोथीवर आधारलेल्या आहेत. या पद्धतीने विचार करूनच मी असे ठरविले की, सुमारे दोनशे पदे. वीस चौपाया. एक चौतीस कडव्यांची चौपाई आणि साडेसातशे साख्या इतकेच फक्त निरपवादपणे कबीरदासांचे काव्य म्हणून मान्य करता येण्यासारखे आहे. हे संकलन 'कबीर-ग्रंथावली' या नावाने अलाहाबाद विद्यापीठाच्या हिंदी परिषदेच्या विद्यमाने प्रकाशित करण्यात आले आहे. यात दिलेली सर्वच काव्यरचना अगदी कबीरदासांनी हुबेहूब जशी कथन केली असेल तशीच आहे किंवा नाही, हे सांगणेही बरेच कठीण वाटते. परंतु इतके मात्र ठामपणाने सांगता येईल की, आजवर जितकी म्हणून कबीर-काव्याची संकलने उपलब्ध झाली आहेत त्या सर्वांमध्ये हे अधिक प्रामाणिक स्वरूपाचे आहे – तसा थोडाफार मतभेद तर व्हायचाच!

कबीरदासांनी अनेक लोकांना शास्त्रार्थामध्ये पराभूत करून त्यांना आपले शिष्य बनविले, अनेक श्रद्धावंतांना वेळोवेळी उपदेश दिला, असा कबीरपंथाच्या अनुयायांचा विश्वास आहे. असे शास्त्रार्थपर उपदेश ज्या ग्रंथातून आले आहेत त्यांना 'गोष्ठी-ग्रंथ' किंवा 'बोध-ग्रंथ' असे म्हटले जाते. उदाहरणार्थ, कबीर-गोरख गोष्ठी, कबीर-शंकराचार्य गोष्ठी, कबीर-दत्तात्रेय गोष्ठी, कबीर-देवदूत गोष्ठी, कबीर-जोगाजीत गोष्ठी, कबीर-सर्वाजित गोष्ठी, कबीर-हनुमान गोष्ठी, कबीर-वशिष्ठ गोष्ठी, कबीर-रैदास गोष्ठी, आणि मुहम्मदबोध, सुलतानबोध, गरुडबोध, अमरसिंहबोध, वीरसिंहबोध, जगजीवनबोध. भूपालबोध, कमालबोध, ज्ञानप्रकाश अथवा धर्मदासबोध, इत्यादी. आपणांस असे आढळून येते की, यात देशकालाच्या मर्यादा उल्लंघून दोन अशा माणसांबरोबरही संवाद करविला गेला आहे की ज्यांच्या काळामध्ये शेकडो वर्षांचे अंतर स्पष्ट आहे. तरीदेखील कबीरपंथाचे अनुयायी या सर्व ग्रंथांचे कर्तृत्व कबीरदासांचेच आहे असे मानीत असतात. कारण त्यांचा मुळी असा विश्वासच आहे की कबीर आवश्यकतेनुसार कोणत्याही वेळी देह धारण करू शकतात. परंतु या ग्रंथांचे अवलोकन केले असता अगदी स्पष्टपणे असे दिसून येते की, जेव्हा कबीरपंथाचा प्रारंभ झाला आणि अन्य पंथांच्या लोकांकडून त्याविरुद्ध टीकेची प्रतिक्रिया सुरू झाली त्यावेळीच या सर्व ग्रंथांची निर्मिती केली गेली असावी. यात कल्पनेचा फार मोठा विलास दिसून येतो. यासाठी 'गोरख-गोष्ठी' चे उदाहरण देता येईल. जेव्हा गोरखबाबा कबीरदासांशी शास्त्रार्थ करण्यासाठी आले तेव्हा त्यांनी आपले त्रिशूल जमिनीत पुरले आणि त्याच्या एका टोकावर कबीरदासांना बसण्यास सांगून त्यांनी संवादास प्रारंभ करण्याचे आवाहन केले. यावेळी आपल्या चरख्याच्या सूत गुंडाळण्याच्या नळीतून एक धागा ओढून तो हवेत उडवून आणि त्यावर आरूढ होऊन वरूनच कबीरदासांनी म्हटले, "नाथजी, त्रिशूल तर जमिनीवर आपण उभे केले आहे. या, असे वर या धाग्यावर बसून आपण

बोलणे करूया. हा आधार न घेता आकाशात उभा आहे. पृथ्वीवर यापेक्षा अधिक सुंदर अशी कोणती बरे दुसरी जागा आपल्याला मिळू शकेल?" एका दुसऱ्या गोरख-गोष्ठीचा हा मासला पाहा --

प्रश्न गोरखनाथांचा :

**सिद्धा कौने दीना डंड कमंडल, किन दीनी मृगछाला ।**
**कौने तुमको हरिनाम सुनाया, किन दीनी जपमाला ॥**

यावर कबीरांचे उत्तर :

**ब्रम्हा दीनी डंड कमंडल, शिव दीनी मृगछाला ।**
**गुरु हमारे हरिनाम सुनाया, बिष्णु दीनी जपमाला ॥**

गोरखनाथांचा पुन्हा प्रश्न :

**अंडान मंडान, चारि खुरी को कान**
**जानै तो जान, नहीं झोली माला आगे आन ॥**

कबीर उत्तर देतात :

**अंडान धरती मंडान आकास ।**
**चारि खुंड चारि खुरी चंद सूर दो कान ।**
**नहीं आनौं झोली नहीं आनौं माला ।**
**मोहिं गुरु रामानंद की आन ॥**
**सींगी झोली और चरपटी ।**
**फिर बोलै तो मारौं कनपटी ॥**

"योग्याला दंडकमंडलू आणि मृगचर्म दिले कुणी! आणि तुला ईश्वराचे नाव तरी कुणी दिलं! जनमाळ कुणी दिली?" या गोरखनाथांच्या प्रश्नांवर कबीरांनी उत्तर दिले, "ब्रह्मदेवाने दंडकमंडलू दिला. महादेवाने मृगचर्म दिले. माझ्या गुरुदेवांनी ईश्वराचे नामस्मरण सांगितले. भगवान विष्णूने जपमाळ दिली." यावर गोरखनाथांनी कूटप्रश्न विचारला, "अंगण आणि मंडप, त्याला चार खांब वर दोन कान. ओळखत असशील तर सांग, नाहीतर तुझी झोळी आणि माळ आण!" त्यावर कबीरांनी उत्तर दिले, "पृथ्वीचे अंगण आणि वर आकाशाचा मांडव. अष्टदिशा हेच त्याचे खांब. चंद्र आणि सूर्य हे त्याचे कान. आता नाही आणीत माळा आणि नाही आणीत झोळी. मला गुरू रामानंदांची आण! तुझी शृंगी, झोळी आण! पुन्हा बोलशील तर देईन कानफटात!"

अशा प्रकारे कबीरदासांनी गोरखबाबांना पूर्णपणे निरुत्तर केल्यावर ते आपला चंबूगबाळे आवरून मुकाट्याने पसार झाले!

अशा प्रकारे आपण हे पाहतो की, हे सर्व ग्रंथ कबीरदासांनी रचलेले नसून त्यांच्या नंतरच्या कबीरपंथीयांनी लिहिलेले आहेत. कबीरांशी संवाद करणाऱ्या दुसऱ्या पक्षाची म्हणून जी नावे आहेत (ज्याप्रमाणे गोरखनाथ) ती वास्तविक त्यांच्या शिष्यांचीच प्रतीक नावे आहेत. कबीरदासांनी म्हटले आहे –

**जो पहिरा सो फटिसी, नाम धरा सो जाइ ।**

जे कपडे आपण वापरतो ते केव्हा-ना-केव्हा नक्कीच फाटून जात असतात. याचप्रमाणे आपला आत्मा हा शरीररूपी कपडे धारण करतो; आणि ते कपडेही वेळ आली की पंचतत्त्वांमध्ये विलीन होऊन जातात.

कबीरदासांचा अंत्यकाल जेव्हा समीप येऊन ठेपला तेव्हा ते काही कारणाने काशी सोडून मगहर नावाच्या गावी गेले होते. सध्या हे गाव बस्ती नावाच्या जिल्ह्यामध्ये आहे. आपल्या अंतिमकाळात ते मगहर येथे का गेले असावेत यासंबंधी लोक नाना प्रकारची अनुमाने व्यक्त करीत असतात. बरेचसे लोक म्हणतात, हिंदू समाजाचा फार दिवसांचा असा समज आहे की, मगहर येथे मेले तर मुक्ती मिळत नाही. ही उक्ती प्रसिद्ध आहे –

**मगहर मरै सो गदहा होय ।**

मगहर येथे जो मरतो तो पुढल्या जन्मी गाढव होतो. पुराणात अशी एक कथा आहे की - प्रजापती दक्षाने याच गावी एक मोठा यज्ञ केला होता. या यज्ञाच्या वेळी त्याने शंकराला त्यात भाग घेऊ न देऊन त्याचा अपमान केला. आपल्या पतीचा अपमान झाला म्हणून प्रजापती दक्षाची कन्या सती हिने ताबडतोब आपल्या शरीराचा त्याग केला. यामुळे चिडून जाऊन शंकराने आपले सैनिक पाठवून दक्षाच्या यज्ञाचा विध्वंस करविला होता आणि त्याच वेळी असा शाप दिला होता की, या गावी जो शरीर-त्याग करील आणि माझ्याशी शत्रुत्व करणारा असेल अथवा विष्णूचा भक्त असणार नाही तो पुढील जन्मी गाढव म्हणून जन्माला येईल. आपल्या संपूर्ण आयुष्यभर अंधविश्वासाविरुद्ध बंड पुकारणाऱ्या कबीरदासांनी मगहर गावाचा हा कालिमा दूर करण्यासाठीच येथे येऊन आपल्या आयुष्याचा अखेर-काळ घालविला आणि येथूनच स्वर्गलोकी प्रयाण केले. कबीरदासांचा हा निश्चय जेव्हा लोकांना ठाऊक झाला तेव्हा दूरदूरचे राजेमहाराजे, नबाब, भक्तगण त्यांचे अंतिम दर्शन घेण्यासाठी काशी नगरीत येऊ लागले अशी माहिती कबीरपंथ ग्रंथांतून दिलेली आहे. काशीनरेश वीरसिंहदेव बघेला, रीवा-नरेश रामसिंह आणि अयोध्येचा नबाब महमुद्दौला इत्यादी एकत्र आले आणि त्यांनी त्यांच्यापाशी अशी नम्र विनंती केली की, मगहर येथे जाताना त्या सर्व लोकांनाही त्यांनी आपल्याबरोबर घेऊन चलावे. कबीरदासांनी त्यांची ही विनंती मान्य केली. अशा प्रकारे जेव्हा सर्व मंडळी काशी सोडून मगहर येथे येऊन पोहोचली तेव्हा त्या गावी एक भली मोठी जत्राच भरल्यासारखे वाटू लागले. आणि इकडे

काशीवर जणू अंधाराची दाट छायाच पडून गेली. ती नगरी अगदी भकास दिसू लागली. मगहर येथे तेथील नबाब बिजलीखान पठाण यांच्याकडून सर्व मंडळींसाठी भोजनाची व्यवस्था करण्यात आली. परंतु तेथे एवढ्या प्रचंड जनसमुदायासाठी पाण्याची मात्र व्यवस्था नव्हती; कारण, शंकराच्या शापाने तेथील नदी आटून गेली होती. स्थानिक लोकांची अडचण दूर करण्यासाठी कबीरदासांनी आपल्या दिव्य शक्तीने त्या नदीत पुन्हा पाण्याचा प्रवाह निर्माण केला आणि तिचे नाव 'आमी' असे ठेवले. कारण, आता तिचे शीतल जल अमृतासारखे गोड झाले होते. यानंतर तेथे एकत्र जमलेल्या सर्व लोकांना आपला अंतिम उपदेश कथन केला आणि जवळच असलेल्या एका संताच्या झोपडीत त्यांनी प्रवेश केला व दार बंद करवून घेतले. थोड्या वेळाने एक मोठा आवाज लोकांना ऐकू आला आणि एक दिव्य ज्योती त्या झोपडीतून निघून वर आकाशाच्या दिशेने निघून गेली. कबीरदासांचे महाप्रयाण झाल्याची लोकांची खात्री पटली आणि त्यांनी त्यांचा त्रिवार जयजयकार केला.

परंतु यानंतरदेखील एक भांडण लागलेच. काशी-नरेश वीरसिंहदेव आणि अन्य सर्व हिंदू भक्तगण म्हणत होते की, कबीर हे हिंदूंचे गुरू असल्यामुळे त्यांचा अंतिम संस्कार हिंदूंच्याच रीतिरिवाजाप्रमाणे म्हणजे शरीरास अग्नी देऊनच व्हावयास हवा. दुसरीकडे बिजलीखान आणि त्यांचे मुसलमानी साथीदार म्हणत होते की, कबीर मुसलमानांचे पीर किंवा धर्मगुरू असल्याकारणाने त्यांचा शेवटचा संस्कार हा मुस्लिम धर्माच्या पद्धतीप्रमाणे दफन करूनच पार पाडावयास हवा. हा वाद इतका वाढला की शेवटी दोन्ही बाजूंची मंडळी तलवारी उपसून तयार झाली आणि युद्धाच्या नौबती झडू लागल्या. परंतु याच वेळी आकाशवाणी झाली – "तुम्ही मंडळी विनाकारण परस्पर मुडदे पाडू नका. झोपडीचा दरवाजा उघडून पाहा तर खरे!" हे ऐकून लोकांनी त्या झोपडीचा दरवाजा उघडला. पाहतात तो काय, तेथे कबीरदासांचे मृतशरीर नव्हतेच. परंतु त्याऐवजी तेथे थोडी फुले आणि चादर पडलेली होती. मग लोकांची खात्री झाली की, कबीरदासांना सदेह मुक्ती लाभलेली आहे. नंतर त्यांनी ती फुले आणि चादर अर्धी-अर्धी वाटून घेऊन आपल्या रीतिरिवाजाप्रमाणे त्यांचा अंतिम संस्कार केला. संत गरीबदासांचे म्हणणे आहे –

**कासी तजकर मगहर चाले, किया कबीर पयान ।**
**चदर फूल बिछे ही छांड़े, सब्दे सब्द समान ।।**

संत मलूकदासांनी सांगितले आहे –

**कासी तजि गुरु मगहर आए, दोऊ दीनन के पीर ।**
**कोइ गाड़े कोइ अग्नि जरावै, नेक न धरते धीर ।।**
**चार दाग से सतगुरु न्यारा, अजरो अमर सरीर ।**
**दास मलूक सलूक कहत है, खोजो खसम कबीर ।।**

येथे "चार दाग" चा अर्थ पृथ्वी, पाणी, अग्नी आणि वायू असा आहे. कबीरदासांचे शरीर ५. चारही डागांच्या पलीकडचे होते असा भक्तांचा विश्वास आहे. काही विद्वान

या गोष्टीमागे एक रहस्य दडलेले आहे असे समजतात. त्यांचे म्हणणे असे की, ज्यांच्यामध्ये प्रेताचे दहन करण्याचीही चाल आहे आणि त्याच्या भस्मावर समाधीही बांधण्याची पद्धती आहे अशाच कुटुंबात वास्तविक कबीरदासांचा जन्म झालेला होता. या लोकांचा विचार असा आहे की, त्या काळी काही जोगी जमाती अशा होत्या की ज्यांचा नुकताच हिंदू धर्मातून मुसलमान धर्मामध्ये प्रवेश झालेला होता. अशा जातींमधून काही रिवाज हिंदूंचेही मानले जात, तर काही रूढी मुसलमानांच्याही स्वीकारल्या जात असत. हे लोक बहुधा कापड विणण्याचाही व्यवसाय करीत असत. कबीरदासदेखील अशाच एखाद्या कुटुंबात लहानाचे मोठे झाले, असेही असू शकेल. तसे पाहता, बऱ्याचशा प्राचीन कबीर-चरित्रांमध्ये ह्या फुलांच्या प्रसंगाची अजिबात चर्चा केलेली आढळत नाही. अनंतदासाने लिहिलेल्या 'परचई' या चरित्रग्रंथाचे उदाहरण देता येईल. त्याने कबीरदासांच्या मगहर येथे जाऊन शरीरत्याग करण्याच्या प्रसंगाचे वर्णन तर केले आहे, परंतु प्रेताच्या ठिकाणी फुले झाली, या चमत्काराची चर्चा मुळीच केलेली नाही.

काहीही असो, इतके मात्र अगदी निश्चितपणे म्हणता येते की, कबीरदासांचा मृत्यू मगहर येथेच झाला. कारण त्यांनी स्वतःच त्यांच्या दोन पदांमध्ये ह्या गोष्टीची चर्चा केलेली आहे; आणि त्यांत असे स्पष्ट म्हटले आहे की, ते आपल्या शेवटच्या काळी तेथे गेलेले होते. येथे येण्याचे त्यांचे खरे कारण काहीही असू शकेल. परंतु या पदांतून त्यांनी काशी आणि मगहर यांच्यासंबंधी प्रचारात असलेल्या चुकीच्या समजुतीचे खंडन केलेले आहे. त्या पदांपैकी एकाच्या काही ओळी अशा आहेत –

**अब कहु राम कवन गति मोरी ।**
**तजिले बनारस मति भई थोरी ॥**
**सगल जनम सिवपुरी गँवाया ।**
**मरती बार मगहर उठि आया ॥**
**बहुत बरिस तपु कीया कासी ।**
**मरनु भया मगहर की बासी ॥**

दुसऱ्या पदामध्ये त्यांच्या दृढ आत्मविश्वासाची झलक दिसून येते –

**लोगो तुम हौ मति के भोरा ।**
**जऊ कासी तनु तजहि कबीरा तो रामहिं कौन निहोरा ॥**
**जो जन भाउभगति कछु जानैं ताकी अचरजु काहो ।**
**जैसे जल जलहीं ढुरि मिलियौ त्यौं ढुरि मिल्यौ जुलाहो ॥**
**कहे कबीर सुनहु रे लोई भरमि न भूलौ कोई ।**
**क्या कासी क्या मगहर ऊखर हिदै राम जो होई ॥**

आपल्या भावभक्तीच्या आत्मविश्वासामुळे मगहर गावी प्राणत्याग करण्यानेसुद्धा ते आपल्या रामाच्या ठायी अशा रीतीने एकरूप होऊन जाणार होते, जसे पाणी पाण्याबरोबर

पूर्णपणे मिसळून जात असते. त्यांना या गोष्टीचा जबरदस्त विश्वास वाटत असे. ज्याच्या हृदयी रामच राम भरून राहिलेला आहे, त्याला मगहर येथे मरणे आणि काशी येथे मरणे दोन्ही सारखेच. जर काशी येथे मरूनच माणसाला मुक्ती मिळणार असेल, तर त्यात प्रभू रामाचे मोठेपण ते कोणते?

मगहर येथेच कबीरदासांचा मृत्यू झाला याविषयी जरी काही मतभेद नसले तरी त्यांचा मृत्यू केव्हा झाला याबद्दल मात्र कित्येक मतभेद आहेत. त्यांच्या मृत्यूच्या बाबतीत आजवर एकूण चार प्रकारची मते आहेत. खाली दिलेल्या पद्यपंक्तींच्या आधारे ही मते प्रचारात आहेत –

(१) **संवत पंद्रह सौ पचहत्तरा, किया मगहर को गौन ।**
**माघसुदी एकादसी, रलो पौन में पौन ॥**

(२) **पंद्रह सौ औ पांच में, मगहर कीन्हों गौन ।**
**अगहन सुदि एकादसी, मिल्यौ पौन में पौन ॥**

(३) **पंद्रह सौ उनचास में, मगहर कीन्हों गौन ।**
**अगहन सुदि एकादसी, मिलो पौन में पौन ॥**

(४) **संवत पंद्रह सौ उनहत्तरा रहाई ।**
**सतगुरु चले उठी हंसा ज्याई ॥**

पहिल्या दोह्याच्या दुसऱ्या चरणामध्ये काही जागी 'आहनसुदि एकादसी' असाही पाठ सापडतो. ह्या सर्व काव्यपंक्ती लोकांमध्ये मौखिक स्वरूपातच प्रचलित राहिल्या आहेत. यांचे लेखक कोण आहेत ते नेमके सांगता येणार नाही. परंतु कबीरपंथाचे अनुयायी बहुधा पहिलाच दोहा प्रमाण मानून कबीरदासांचा अंत संवत १५७५ मध्ये झाला असे मानतात. अशा प्रकारे ते लोक संवत १४५६ च्या ज्येष्ठ पौर्णिमेपासून ते संवत १५७५ च्या भाद्रपद शुद्ध एकादशीपर्यंत म्हणजे ११९ वर्षे ५ महिने आणि २७ दिवसांचे कबीरदासांचे आयुष्य मानतात. 'कबीर कसौटी' नावाच्या आपल्या ग्रंथामध्ये बाकू लहनासिंह नामक कबीरपंथी लेखकाने असे लिहिले आहे की, माघ शुद्ध एकादशी बुधवार संवत १५७५ रोजी कबीरदास मगहर गावी रवाना झाले आणि तेथे पोहोचल्यानंतर त्याच दिवशी त्यांनी आपल्या शरीराचा त्याग केला. परंतु, संवत १५७५ मधील माघ शुद्ध एकादशी बुधवारी येत नसून मंगळवारी येते.

भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण खात्याच्या एका अहवालावरून खालील माहिती प्राप्त होते. बिजलीखान याने बस्ती जिल्ह्याच्या पूर्वेस आमी नदीच्या उजव्या तीरावर कबीरदासांचा एक रौजा (कबरीवरील इमारत, समाधी) संवत १५०७ अथवा सन १४५० मध्ये बांधविला. नबाब फिदाईखाँ याने ११७ वर्षांनी म्हणजे संवत १६२४ अथवा सन १५६७ मध्ये त्याची दुरुस्ती करविली होती. यावरून असे दिसते की त्यांचा मृत्यू संवत १५०५ मध्येच झाला असावा. कारण रौजा किंवा स्मारक तर मृत्यूनंतरच तयार करविण्याची प्रथा आहे. यामुळे

वर दिलेल्यांपैकी दुसरा दोहाच त्यांच्या मृत्यूचे योग्य वर्ष सांगणारा म्हणून अधिक योग्य वाटतो. एक प्रकारे विचार केला असता, पहिल्या दोह्यामध्ये जे 'संवत पंद्रह सौ पचहत्तरा' असे म्हटले आहे त्याचा अर्थही बहुधा पंधराशे-पाच असाच आहे. दादूपंथी कवी राघवदासाने आपल्या 'भक्तमाल' ग्रंथाचा लेखनकाल सांगताना 'संवत सत्रह सौ सत्रहोत्तरा' असे लिहिलेले आहे याचा अर्थ संवत १७१७ असाच केला जातो, संवत १७७० असा नव्हे. याचप्रमाणे कबीरदासांच्या मृत्यूचे वर्षही प्रथम 'पंद्रह सौ पंचहोत्तरा' म्हणूनच पसिद्ध असेल आणि पुढे ती ओळ अपभ्रष्ट होत होत 'पंद्रह सौ पंचहोत्तरा' अथवा "पंद्रह सौ पचहत्तरा" अशी झाली असेल. 'पंद्रह सौ पंचहोत्तरा' चा अर्थ होईल पंधराशेच्या पुढे पाच वर्षानंतर. अशाच तऱ्हेने 'सत्रहोत्तरा' चा अर्थ आहे सत्रा वर्षानंतर. 'उत्तर' या पदाचा अर्थ 'नंतर' **अथवा** 'पूर्वी' असाही लावता येतो. या रीतीने विचार केला असता खरे म्हणजे, कबीरदासांचे वय त्यांच्या मृत्यूच्या वेळी पन्नास वर्षांचे असू शकेल.

प्राचीन संत-भक्तांनी आपल्यासंबंधी अधिक काही लिहून ठेवण्याची कधी काळजीच वाहिली नाही. आणि कधी काही सांगितलेच तर ते केवळ आपली नम्र वृत्ती प्रकट करण्याच्या हेतूनेच सांगितले. संत तुलसीदास आणि संत सूरदास यांच्या बाबतीतसुद्धा आपल्याला हेच दिसून येते. पुढे संत प्राणनाथ इत्यादींच्या दिनक्रमाबद्दल त्यांच्या शिष्यगणांनी विस्ताराने लिहिले आहे आणि त्यात बराच सत्याचा अंशही आढळून येतो. परंतु कबीरदासांच्या बाबतीत असे कोणी चरित्र-लेखन करू शकले नाही ही दुर्दैवाची गोष्ट होय. वरील सर्व विवेचनावरून आपणांस असे आढळून येईल की, ज्यांच्या सत्यतेविषयी आपण ठामपणाने काही बोलू शकतो, अशा त्यांच्या चरित्रातील केवळ दोनच गोष्टी आपल्याला ज्ञात होऊ शकलेल्या आहेत. ते काशी येथे राहणारे कोष्टी होते ही पहिली गोष्ट; आणि त्यांनी मगहर येथे आपली इहलोकीची यात्रा समाप्त केली ही दुसरी. परंतु खरेतर लौकिक जीवन-मरण संतांच्या बाबतीत महत्त्वाचे ठरत नाही. त्यांच्या कार्यातच त्यांचे खरे माहात्म्य सामावलेले असते. कबीरदासांचा जन्म कोठेही झालेला असो, आणि त्यांचे पालनपोषण कितीही हीन कुटुंबात का झालेले असेना, आपल्या कर्तृत्वाने त्यांनी संपूर्ण जगाला हे सिद्ध करून दाखविले की मानव हा जन्माने नव्हे तर कर्माने मोठा होतो. नाभादासांनी 'भक्तमाले'त त्यांची ओळख करून देताना म्हटले आहे—

**कबीर कानि राखी नहीं,**
**वर्णाश्रम खट दरसनी ।**

कबीरदास वर्णाश्रमपद्धतीचा किंवा जातपातीचा विचार मानणाऱ्यांपैकी नव्हते. त्यांची परमेश्वरावर पूर्ण श्रद्धा होती. आणि आपल्या श्रेष्ठ दर्जाच्या साधनेने ते त्या दिव्य शक्तीशी 'एकाकार' झाले होते. त्यांच्या दृष्टीतून भेदाभेद नाहीसाच झाला होता; म्हणून ते स्वतःला अमर समजत असत. त्यांनी म्हटले आहे—

**हम न मरैं मरिहै संसारा ।**
**हमकौं मिला जियावनहारा ॥**
**हरि मरिहै तौ हमहूं मरिहैं ।**
**हरि न मरे हम काहे को मरिहैं ॥**
**कहै कबीर मन मनहिं मिलावा ।**
**अमर भये सुखसागर पावा ॥**

आम्ही मरणार नाही. हे जग कदाचित मरणार असेल. आम्हांला तो जीवन देणारा जगदीश भेटलेला आहे. तो हरी जर मर्त्य असेल तर मग आम्हीही मरू. ईश्वर जर मर्त्य नाही, तर मग आम्ही कसे मर्त्य असू? म्हणून कबीर म्हणतो, आता मन त्या परमशक्तीशी एकत्व पावलेले आहे. सुखाचा साक्षात सागर आम्हांला लाभला. आम्ही आता अमर झालो आहोत!

आणि कबीर खरोखरीच अमर झाले आहेत—त्यांचे नश्वर शरीर राहिलेले नसेल. पण त्यांची यशोगाथा चिरकाल टिकणारी आहे. कारण, त्यांनी त्या 'सुखसागरा'ची प्राप्ती करून घेतली होती आणि सत्याचा प्रत्यक्ष साक्षात्कार उपभोगला होता!

# एक
# पदे

### (एक)

**हमारे गुर बड़े भ्रिंगी ।**
**आनि किटक करत भ्रिंग सो आपतैं रंगी ।।टेक ।।**
**पाइं औरै पंख औरै और रंग रंगी ।**
**जाति पाति न लखै कोई भगत भौ भंगी ।।१।।**
**नदी नाला मिले गंगा कहावैं गंगी ।**
**समानी दरियाव दरिया पार ना लंघी ।।२।।**
**चलत मनसा अचल कीन्हीं मांहिं मन पंगी ।**
**तत्त मैं निहतत्त दरसा संग मैं संगी ।।३।।**
**बंध तैं निर्बंध कीया तोरि सब तंगी ।**
**कहै कबीर अगम किया गम राम रंग रंगी ।।४।।**

आमचे गुरू भृंगीसारखे आहेत. दुसऱ्या किड्यांना आणून त्यांना आपल्याप्रमाणेच भृंग किंवा भुंगा बनवीत असतात. त्या किड्यांचे मग पाय वेगळ्या प्रकारचे होऊन जातात. पंखही बदलून जातात. ते दुसऱ्याच रंगात रंगून जातात. जातपात इथे कोणी पाहत नाही. भंगी (सुद्धा) भक्त बनला आहे. नदी-नाले जेव्हा गंगेत मिळून मिसळून जातात, तेव्हा त्यांना गंगाच म्हटले जाते. आणि तीच नदी जेव्हा सागरात सामावून जाते तेव्हा तर तिच्या अस्तित्वाचा पत्ताही लागत नाही. माझ्या गुरुजींनी चंचल मनास निश्चंचल करून टाकले आहे. यामुळे आता माझे मन बाहेर भटकंती न करता आतच रमून बसले आहे. पंचतत्त्वांच्या स्थूल देहामध्ये त्या तत्त्वांच्या पलीकडील सूक्ष्म ब्रह्माचे दर्शन घडले आणि आत्म्याचा सोबती (परमात्मा) समोरच दिसून आला. सर्व बंधने तोडून त्याने मला रामाच्या रंगात दंग करून सोडून अगम्यासही गम्य करून टाकले. अर्थात, मी त्या दिव्य सुखाप्रत पोहोचू शकलो आहे.

## (दोन)

**गोकुल नाइक बीठुला मेरा मनु लागा तोहिं रे ।**
**बहुतक दिन बिछुरे भए तेरी औसेरि आवै मोहिं रे ॥टेक॥**
**करम कोटी कौ ग्रेह रच्यौ रे नेह गए की आस रे ।**
**आपहिं आप जंघाइया दोइ लोचन मरहिं पियास रे॥१॥**
**आप पर समि चीन्हिए तब दीसै सरब समान ।**
**इहिं पद नरहरि भेंटिए तू छांड़ि कपट अभिमान रे ॥२॥**
**ना कतहूं चलि जाइए ना लीजे सिरि भार ।**
**रसना रसहिं बिचारिए सारंग स्त्री रंग धार रे ॥३॥**
**साधन तैं सिधि पाइए किंबा होइम होइ ।**
**जे दिढ़ ग्यान न ऊपजै तौ अहटि मरै जनि कोइ रे ॥४॥**
**एक जुगुति एक मिलै किंवा जोग कि भोग ।**
**इन दोनिउं फल पाइए राम नाम सिधि जोग रे ॥५॥**
**तुम्ह जिनि जानौं गीत है यह निज ब्रह्म बिचार ।**
**केवल कहि समझाइया आतम साधन सार रे ॥६॥**
**चरन कंवल चित लाजिए राम नाम गुण गाइ ।**
**कहै कबीर संसा नहीं भुगुति मुकुति गति पाइ रे ॥७॥**

हे गोकुळनायका! विठ्ठला! माझे मन तुझ्या ठायी रंगले आहे. आपला विरह झाल्याला खूप काळ लोटला. (आत्मा परमात्म्यापासून दुरावल्याला खूप दिवस झाले.) आता तुझी आठवण येते आहे! करोडो कर्मे करणाऱ्या शरीरास किंवा जगतास राहण्याचे घर बनविले आणि निर्मोही अर्थात मायेमध्ये आशा गुंतविली. अशा प्रकारे माझे दोन्ही डोळे तुझ्या दर्शनाच्या तहानेने व्याकुळ बनले आहेत. आपले आणि दुसऱ्याचे जर समदृष्टीने पाहिले तर सर्वत्र समानता आढळून येत असते. अशाच तऱ्हेने नरहरीस प्राप्त करून घेता येते. म्हणून (हे साधका) तू कपट आणि अहंकार यांचा त्याग कर. कोठे निघून जाण्याची आवश्यकता नाही; किंवा शिरावर पुस्तकी ज्ञानाचे ओझेही वाहण्याची जरुरी नाही. घरीच बसल्या बसल्या श्रीरंग सारंगधराच्या नामस्मरणाची गोडी चाखली पाहिजे, आणि त्याचेच मनन-चिंतन करायला हवे. साधनेमुळे सिद्धी प्राप्त करता येते, आणि तीही कदाचित मिळेल किंवा मिळणार नाही, परंतु जर पक्के ज्ञान झाले नाही तरी कोणी दुःखी कष्टी होऊन न मरो (निराश न होवो). एका युक्तीने एकच वस्तू प्राप्त होते — एक योग तरी किंवा एक भोग तरी. परंतु, रामनामाच्या सिद्धीमध्ये मात्र योग आणि भोग या दोहोंची मौज आहे. हे काही तसे साधेसुधेच गाणे आहे अशा भ्रमात तू राहू नकोस! हे आमचे ब्रह्मविषयक विचार किंवा तत्त्वज्ञान आहे. आम्ही केवळ आत्म – साधनेचे मूळ

तत्त्व म्हणून समजावून दिले आहे. रामाचे नामस्मरण करून आणि गुणसंकीर्तन करून त्याच्या चरणी चित्त समर्पित करावयास हवे. कबीर म्हणतो, मग तुला निश्चितच भोग आणि मोक्ष दोन्ही प्राप्त होतील.

## (तीन)

**इहु धन मेरै हरि के नाउं ।**
**गांठिन बांधउं बेंचि न खाउं ॥टेक॥**
**नाउं मेरै खंती नाउं मेरै बारी । भगति करउं जन सरनि तुम्हारी ॥१॥**
**नाउं मेरै माया नाउं मेरै पूंजी । तुमहिं छांड़ि जानउं नहिं दूजी ॥२॥**
**नाउं मेरै बंधिप नाउं मेरै आई । अंत की बेरियां नाउं सहाई ॥३॥**
**नाउं मेरै निरधन ज्यूं निधि पाई । कहै कबीर जैसैं रंक मिटाई ॥४॥**

माझे जे हे हरिनामाचे धन आहे, ते मी गाठीला बांधून ठेवू शकत नाही किंवा ते मी विकून खाऊही शकत नाही. हरिनामाची शेती माझ्यापाशी आहे. हरिनामाचीच माझी वाडी आहे. मी सेवक आहे; तुझ्या चरणाशी राहून तुझीच भक्ती करीत असतो. ईश्वराचे नामस्मरण हीच माझी धनदौलत आहे. भगवन्नामाचेच भांडवल माझ्याकडे आहे. तुझ्याखेरीज दुसरी गोष्ट मी जाणीतही नाही. ईश्वरनाम हेच माझे सखे संवगडी. परमेश्वराचे नाव हेच बंधू. अंतकाळीही (मृत्यू अथवा संकटाच्या वेळी) हरिनाम हेच आधार देणारे ठरते. जसे निर्धनास धनाचे सुख लाभावे तसेच मला परमेश्वराच्या नामाचे सुख वाटते. ज्याप्रमाणे गरिबास मिठाई मिळाल्याचा आनंद होतो त्याप्रमाणेच मला भगवंताच्या नामाचा आल्हाद वाटतो, असे कबीर म्हणतो.

## (चार)

**तेरा जनु एक आध है कोई ।**
**काम क्रोध लोभ मोह बिबरजित हरि पद चीन्हैं सोई ॥टेक॥**
**असतुति निंदा दोउ बिबरजित तजहिं मानु अभिमाना ।**
**लोहा कंचन सम करि जानहिं ते मूरति भगवाना ॥१॥**
**रज गुन तम गुन सत गुन कहिऐ यह सभ तेरी माया ।**
**चउथे पद कौं जो जन चीन्हैं तिनहीं परम पदु पाया ॥२॥**
**चिंतै तौ माधव चिंतामनि हरि पद रमैं उदासा ।**
**चिंता अरु अभिमान रहित है कहै कबीर सो दासा ॥३॥**

हे रामा! तुझा भक्त कोणी एखादाच असतो. जो काम, क्रोध, लोभ, मोह यांच्यापासून दूर होतो, त्यालाच भगवंताची खरी ओळख होऊ शकते. जो निंदा आणि स्तुती दोहोंचा त्याग करतो, मान-अपमानाचा भाव सोडून देतो, लोखंड आणि सोने यांस एकसारख्याच

दृष्टीने पाहतो तो तर साक्षात ईश्वरच आहे. सत्त्वगुण, रजोगुण, तमोगुण इत्यादी जे सांगितले आहे ती सर्व तुझीच माया आहे. चतुर्थ पदास जो भक्त समजू शकतो, जाणू शकतो तोच परमपद प्राप्त करीत असतो. जर चिंतन करावयाचे असेल तर माधवरूपी चिंतामणीचे चिंतन करा. तो समस्त चिंतापासून मुक्ती देवविणारा आहे. निरासक्त भावनेने परमपदाचा आनंद प्राप्त करावा. कारण जो चिंता आणि अभिमान यांच्यापासून दूर असतो तोच कबीरदासांच्या मते ईश्वराचा सच्चा सेवक किंवा भक्त होऊ शकतो.

## (पाच)

**बाबा अब न बसउं यहि गाउं ।**
**घरी घरी का लेखा मांगै काइथ चेतू नाउं ।।टेक।।**
**देही गांवा जिउधर महतौ बसहिं पंच किरसाना ।।**
**नैनूं नकटू स्रवनूं रसनूं इंद्रीं कहा न माना ।।१।।**
**धरमराइ जब लेखा मांगै बाकी निकसी भारी ।**
**पंच क्रिसनवां भागि गए लै बांध्यो जिउ दरबारी ।।२।।**
**कहै कबीर सुनहु रे संतहु खेतहिं करहु निबेरा ।**
**अब की बेर बखसि बंदे कौं बहुरि न भौजलि फेरा ।।३।।**

अरे बाबा! आता मी या गावात (शरीरात) राहणारही नाही. कारण येथे कायस्थ (लेखक किंवा कायेत स्थित असा, शरीरात राहणारा) चेतू (चित्रगुप्त किंवा चित्त) प्रत्येक क्षणाक्षणाचा हिशेब मागू लागला आहे. देह एक गाव आहे. प्राण धारण करणारा आत्मा हा त्या गावचा नेता आहे. आणि त्यात पाच शेतकरी राहतात. त्यांची नावे अशी आहेत— डोळे, नाक, कान आणि जिव्हा. अन्य इंद्रियेदेखील अशी शक्तिशाली आहेत की ती सांगितलेले ऐकत नाहीत. धर्मराजाने जेव्हा हिशेब मागितला तेव्हा जमेच्या बाजूस किंवा पुण्याच्या खात्यात काहीच निघाले नाही. खोटीनाटी करणी मात्र फार दिसून आली. हे पाहून पाचही शेतकरी (जी सदैव जीवाची पर्वासुद्धा करीत नाहीत अशी ज्ञानेंद्रिये) पळ काढून निघून गेले. मग जीवालाच दरबारातील लोक (यमदूत) बांधून घेऊन गेले. कबीर म्हणतो, हे संतजन हो, ऐका. या शेताचा (शरीराचा) नीटपणे शेवट करून टाका. आताच्या वेळी या दीनास माफ करून सोडून द्या. त्यामुळे त्याला पुन्हा एकदा भवसागरात फेऱ्या घालीत बसण्याची वेळ यायला नको!

## (सहा)

**ता मन कौं खोजहु रे भाई ।**
**तग छूटे मन कहां समाई ।।टेक।।**
**सनक सनंदन जैदेउ नामा । भगति करी मन उनहुं न जाना ।।१।।**

**सिव बिरंचि नारद मुनि ग्यानी । मन की गति उनहुं नहिं जानी ॥२॥**
**ध्रू प्रहलाद बिभीखन सेखा । तन भीतर मन उनहुं न पेखा ॥३॥**
**ता मन का कोई जानैं न भेउ । ता मनि लीन भया सुखदेउ ॥४॥**
**गोरख भरथरी गोपीचंदा । ता मन सौं मलि करैं अनंदा ॥५॥**
**अकल निरंजन सकल सरीरा । ता मन सौं मिलि रहा कबीरा ॥६॥**

हे बंधो! त्या मनास जरा शोध पाहू! शरीर सोडून गेल्यावर मन कोठे सामावून जाते? सनक, सनंदन, जयदेव आणि नामदेव यांनी भक्ती केली. परंतु मनास तेही समजू शकले नाहीत. इतकेच काय, पण शिव, ब्रह्मदेव आणि ज्ञानी नारदमुनीसुद्धा त्या मनाची गती जाणू शकले नाहीत. ध्रुव, प्रल्हाद, बिभीषण आणि सहस्र सुखांचा शेषसुद्धा त्या शरीराच्या आतील मनाचे रहस्य उलगडू शकले नाहीत. त्या मनाचे रहस्य कोणी जाणूच शकत नाही. वास्तविक, त्या मनामध्ये शुक्रदेव तल्लीन झाला; गोरखनाथ, भर्तृहरी आणि गोपीचंद ह्यांनी त्या मनापासून आनंद मिळविला. ज्याच्याविषयी काहीही विचार करता येत नाही आणि जे निरंजन आहे अन् सर्वांच्या टायी विद्यमान आहे, त्या मनाशी कबीराचे मिलन झाले आहे.

## (सात)

**अब मोहिं नाचिबौ न आवै ।**
**मेरौ मन मंदरिया न बजावै ॥ टेक ॥**
**ऊभर था सो सूभर भरिया त्रिसना गागरि फूटी ।**
**काम चोलना भया पुराना गया भरम सभ छूटी ॥१॥**
**जे बहु रूप किए ते कीए अब बहु रूप न होई ।**
**थाकी सौंज संग के बिछुरे राम नाम बसि होई ॥२॥**
**जे ये अचल अचल है थाके चूके बाद बिबादा ।**
**कहे कबीर मैं पूरा पाया भया राम परसादा ॥३॥**

आता मला नर्तन करता येत नाही आणि माझे मन आता मंदला (एक वाद्य) वाजवू शकत नाही — वाजवू इच्छित नाही. हे पूर्वी ईश्वराच्या स्मरणापासून वंचित राहिले होते. आता ते त्याने काठोकाठ भरलेले आहे. तृष्णेची घागर आता फुटून गेली आहे. कामवासनांचे जे कपडे घालून जीवनाचे नाटक करायचे, ते कपडेच आता जीर्णशीर्ण होऊन गेले. आणि त्या भ्रमाचाही पूर्ण निरास झाला की ज्यामुळे सतत नाचगाण्याचे आकर्षण वाटत राहायचे. या जगाच्या नाटकात जी जी रूपे बदलत राहिलो ते आता झाले ते होऊन गेले. आता तऱ्हेतऱ्हेच्या भूमिका पार पाडणे शक्यच नाही. (संसाराचे नाटक वठविता वठविता मी आता थकून गेलो आहे.) नाचण्यागाण्याच्या सर्व वस्तू तशाच पडून राहिल्या. रामनामाच्या अधीन आम्ही झालो आणि आमचे आप्तस्वकीय

आम्हांपासून दूर सरले. जे चंचल होते ते आता स्थिर झाले — याचे दोन अर्थ आहेत. नृत्यगायनासाठी ज्या हातपाय आदींच्या मुद्रा करीत असे त्या आता करीत नाही. भक्तीच्या दृष्टिकोनातून दुसरा अर्थ आहे — जे मन सदैव भ्रमण करीत असे ते आता एकाच जागी स्थिर झाले आहे, आणि सारा झगडाच संपून गेला. कबीरदास म्हणतात, रामाची कृपा झाली. मी नृत्याची पूर्ण बक्षिसी मिळवून बसलो. अर्थात, मला आता पूर्ण ज्ञान प्राप्त झाले आहे.

### (आठ)

**संतौ भाई आई ग्यान की आंधी रे ।**
**भ्रम की टाटी सभै उड़ानी माया रहै न बांधी रे ॥टेक॥**
**दुचिते की दोइ थूनि गिरानी मोह बलेंडा टूटा ।**
**त्रिसना छानि परी घर ऊपरि दुरमति भांडा फूटा ॥१॥**
**आंधी पाछैं जो जल बरसै तिहिं तेरा जन भीना ।**
**कहै कबीर मनि भया प्रगासा उदै भानु जब चीन्हा ॥२॥**

हे संतजनहो, ज्ञानाचे तुफान आले आहे! भ्रमाच्या सर्व होड्या उलटून गेल्या आहेत. मायेचे बंधन आता राहिले नाही. दोन्हीकडील खांब पडून गेले आहेत. मोहाची आधाराची काठीच तुटून गेली. तृष्णेचे छप्पर जमिनीवर येऊन आदळले. आणि यामुळे दुर्बुद्धीचे भांडे फुटून गेले. ज्ञानाच्या या वादळानंतर भक्तिरसाचा जो पाऊस पडला त्याने तर तुझा दास न्हाऊन निघाला. कबीर म्हणतो, आता भक्तीच्या जलधारांनी जेव्हा वादळ शमले आहे तेव्हा ज्ञानरूपी सूर्य उदयोन्मुख दिसू लागला आहे. आणि मनामध्ये त्याचे प्रकाशकिरण पडू लागले आहेत.

### (नऊ)

**राम मोहि तारि कहां लै जइहौ ।**
**सौ बैकुंठ कहौ धौं कैसा करि पसाउ मोहिं दइहौ ॥टेक॥**
**जउ तुम मोकौं दूरि करत हौ तौ मोहिं मुकुति बतावहु ।**
**एकमेक रमि रहा सभनि मैं तौ काहे भरमावहु ॥१॥**
**तारन तरनु तबै लगि कहिऐ जब लगि तत्त न जाना ।**
**एक राम देखा सबहिन मैं कहै कबीर मन माना ॥२॥**

हे रामा! माझा उद्धार करून तू मला कोठे घेऊन जाणार आहेस? तू कृपेचा वर्षाव करून जो वैकुंठलोक मला देणार आहेस तो सांग तरी कसा आहे? किंवा जर तू मला दूर लोटू इच्छितोस तर मग मुक्ती तरी दाखव. जर सर्व वस्तूंशी एकरूप होऊन रममाण झाला आहेस तर मग मला का बरे भ्रमात पाडतो आहेस? जोवर ज्ञान

होत नाही तोवर तरण्या-तारण्याच्या गोष्टी आपण सांगत असतो. कबीर म्हणतो, मी तर एका रामालाच सर्वत्र पाहिले आहे आणि मनामध्ये त्याची खूणही पटली आहे.

## (दहा)

**बहुरि हम काहेकौ आवहिंगे ।**
**बिछुरे पंच तत्त की रचना तब हम रामहिं पावहिंगे ।।टेक।।**
**पिरथी का गुन पानी सोखा पानी तेज मिलावहिंगे ।**
**तेज पवन मिलि पवन सबद मिलि सहज समाधि लगावहिंगे ।।१।।**
**जैसैं बहुत कंचन के भूखन एकहिं घालि तवावहिंगे ।**
**ऐसैं हम लोक बेद के बिछुरै सुन्निहिं मांहिं समावहिंगे ।।२।।**
**जैसैं जलहिं तरंग तरंगिनी ऐसैं हम दिखलावहिंगे ।**
**कहै कबीर स्वामी सुखसागर हंसहिं हंस मिलावहिंगे ।।३।।**

पुन्हा या जगात आम्ही कशासाठी येतोय? पंचतत्त्वांची ही रचना जेव्हा नष्ट होईल, तेव्हा आम्ही रामास प्राप्त करू. धरणी आपल्या स्वभावाप्रमाणे पाणी शोषून टाकील. आणि पाण्यास अग्नीचे गुण तेजाशी एकरूप करून टाकतील. तेजास आम्ही वायूशी मिसळून टाकू. आणि वायूला आकाशाच्या शब्दगुणाशी मिळवून आम्ही सहजसमाधी लावू. ज्याप्रमाणे सोन्याचे बरेचसे दागिने एकाच भांड्यात घालून तापविले जातात, आणि त्या सर्वांचे अखेर एकच सोने बनते, त्याप्रमाणे आम्ही लोक वेदापासून दूर झाल्यावर शून्याशी समरूप होऊन जाऊ. ज्याप्रमाणे पाण्यावरील लाटालहरी अखेर जलरूप होतात, त्याप्रमाणे आम्हीही परमशक्तीशी एकरूप होऊन त्यांच्यासारखेच दिसू. कबीर म्हणतो, आमचा स्वामी म्हणजे आनंदाचा खजिनाच आहे. आम्ही आमच्या हंसाची (आत्म्याची) त्या हंसाशी (परमात्म्याशी) भेट घडवून आणू.

कबीराने या पदात लययोगासंबंधी लिहिले आहे. पुराणांतही याची चर्चा नित्य आढळून येते. केवळ आपल्या भारतातच नव्हे तर अन्य देशांतील लोकांतही कधी कधी ह्या सर्व गोष्टी, समजुती तशाच्या तशाच आढळून येतात. ॲरिस्टॉटल सिकंदराला उद्देशून लिहिलेल्या आपल्या एका पत्रामध्ये म्हणतो, "पृथ्वीस पाणी, पाण्यास वायू, वायूस अग्नी, आणि अग्नीस आकाशाने (इथर) व्यापिलेले आहे. म्हणून, सर्वांत मोठे स्थान देवदेवतांना लाभलेले आहे, आणि सर्वांत हीन असे स्थान जलचरांना मिळाले आहे." (अल्बेरुनीचा भारत -- अनुवादक संतराम.)

## (अकरा)

**डगमग छांड़ि दे मन बौरा ।**
**अब तौ जरें मरें बनि आवै लीन्हौ हाथि सिंधौरा ।।टेक।।**

**होइ निसंक मगन होइ नाचै लोभ मोह भ्रम छांड़े ।**
**सूरा कहा मरन तैं डरपै सती न संचै भांड़े ॥१॥**
**लोक बेद कुल की मरजादा इहै गले मैं फांसी ।**
**आधा चलि करि पाछैं फिरिहौ होइ जगत में हांसी ॥२॥**
**यह संसार सकल है मैला राम कहैं ते सूचा ।**
**कहै कबीर नाउं नहिं छांड़ौ गिरत परत चढ़ि ऊंचा ॥३॥**

बा, वेड्या मना! आता तू डगमगणे सोडून दे. आता तर अटीतटीचा सामनाच द्यायला हवा. तू सतीचे वाण हाती घेतले आहेस. निर्भय होऊन मग्न होऊन नर्तन कर. लोभ मोहाच्या भ्रमाचा त्याग कर. शूरवीर काय मृत्यूला घाबरतो? सती घरादारातील भांड्यांचा मोह धरीत नाही. लोकलज्जा अन शास्त्रबंधन हेच तर तुझ्या गळ्यास फास लावून बसले आहेत. आता अर्ध्या मार्गातून जर परत फिरशील तर तुझे जगात हसू होईल. सर्व जग भ्रष्ट आहे--जो रामाचे स्मरणचिंतन करतो तोच फक्त पवित्र आहे. कबीर म्हणतो, रामाचे नाव तू सोडू नकोस, पडत-झडत (का होईना) तू तुझा दूरवरचा प्रवास करीत राहा!

कबीराने सती आणि वीर यांना भक्तांचे आदर्श मानले आहे (जसे संत तुलसीदासांनी चातकास मानले आहे). जळून मरून जाणे हाच त्यांचा धर्म आहे.

## (बारा)

**बोलना का कहिए रे भाई ।**
**बोलत बोलत तत्त नसाई ॥टेक॥**
**बोलत बोलत बढ़े बिकारा । बिनु बोलें क्या करहि बिचारा ॥१॥**
**संत मिलहिं कछु सुनिऐ कहिऐ । मिलहिं असंत मस्टि करि रहिऐ ॥२॥**
**ग्यानी सौं बोलें उपकारी । मूरिख सौं बोलें झखमारी ॥३॥**
**कहै कबीर आधा घट बौलै । भरा होइ तौ कबहुं न बोलै ॥४॥**

अरे मित्रा! बोलण्यासंबंधी काय सांगायचे? बोलता बोलता तत्त्व नष्ट होऊन जाते. बोलता बोलता विकार वाढतो. परंतु, बोलल्याशिवाय विचार तरी कसा आणि काय करता येईल? म्हणून फक्त संतजन भेटले असता थोडेफार बोलावे हेच बरे आहे! असंत भेटला तर तोंड मिटून गप्प राहावे. ज्ञानी जनांशी बोलण्यात कल्याण आहे. मूर्खांशी बोलणे म्हणजे निव्वळ झक मारणे आहे. कबीर म्हणतो, पाण्याने अर्धवट भरलेला घडा (ज्ञानाने दरिद्री असलेला माणूस) अधिक हिंदकळत असतो. जर तो ज्ञानाने परिपूर्ण असेल तर कधीही बडबडत बसत नाही.

## (तेरा)

**झूठे तन कौं क्या गरबावै ।**
**मरै तौ पल भरि रहन न पावै ।।टेक।।**
**खीर खांड घृत पिंड संवारा । प्रान गएं लै बाहरि जारा ।।१।।**
**जिहिं सिरि रचि बांधत पागा । सौ सिरु चंचु संवारहिं कागा ।।२।।**
**हाड़ जरै जैसै लकड़ी झूरी । केस जरै जैसै त्रिन कै कूरी ।।३।।**
**कहै कबीर नर अजहुं नरी जागै । जम का डंड मुंड़ महिं लागै ।।४।।**

या मिथ्या कायेची काय घमेंड बाळगतोस? ही जर नष्ट झाली तर पुन्हा क्षणभरही येथे राहू शकत नाही. (प्रेताची लवकरात लवकर विल्हेवाट लोक करीत असतात.) खीर, साखर, तूप इत्यादींचा भोग घेऊन ज्या शरीराचे चोचले पुरविले, तेच शरीर प्राण निघून गेल्यानंतर बाहेर नेऊन जाळून टाकावे लागते. ज्या शिरावर मोठ्या डौलाने फेटा बांधीत होतास, त्याच शिराची कावळे आपल्या चोचींनी विल्हेवाट लावतात. सुकलेली लाकडे जशी जळावीत तशी हाडे जळून खाक होतात. गवताचा ढीग जसा जळावा, तसे केस जळून जातात. कबीर म्हणतो, पण माणूस हे सारे जाणूनसवरूनही जागा होत नाही; आणि तोवर केव्हातरी अचानकपणे यमाचा सोटा शिरावर येऊन पडतो, अर्थात मृत्यू येऊन उभा ठाकतो.

## (चौदा)

**मन रे अहरखि बाद न कीजे ।**
**अपना सुक्रितु भरि भरि लीजै ।।टेक।।**
**कुंभरा एक कमाई माटी बहु बिधि बानी लाई ।**
**काहू महिं मोती मुकताहल काहू व्याधि लगाई ।।१।।**
**काहू दीन्हा पटंबर काहू पलंघ निवारा ।**
**काहू गरो गोंदरी नाहीं काहू सेज पयारा ।।२।।**
**सूमहिं धन राखन कौं दीया मुगध कहै यहु मेरा ।**
**जम का डंडु मूंड़ महिं लागै खिन महिं निबेरा ।।३।।**
**कहै कबीर सुनौं रे संतौ मेरी मेरी झूठी ।**
**चिरकुट फारि चुहाड़ा लै गयौ तनी तागरी छूटी ।।४।।**

बा, मना! रोजचा दिनक्रम पार पाडण्यासाठी फुकटचा तंटाबखेडा करीत बसू नये. फक्त आपली करणी भली असावयास हवी. कुंभाराने एकच माती कालवून तीत पिवळी माती मिसळून त्या मातीमध्ये अनेक रंगछटा तयार केल्या. कोणास माणिकमोती जडवून दिले. कोणामागे व्याधीही लावून दिल्या. (विधात्याने एकाच तत्त्वापासून नाना प्रकारच्या

वस्तू तयार केल्या, आणि कर्माप्रमाणे प्रत्येकाचे भाग्य ठरवून दिले.) कोणाला रेशमाची वस्त्रे दिली, कोणाला नवारीचा पलंग दिला. याउलट,कोणाला जीर्णशीर्ण गोधडीसुद्धा दिली नाही आणि कोणाला गवताची शय्या नशिबी आली. कंजूष माणसास संपत्ती जमवायला सांगितले. तो मूर्ख म्हणतो कसा — हे धन माझे आहे. पण जेव्हा यमराजाचा बडगा डोक्यावर आदळतो (मृत्यू येऊन ठेपतो) तेव्हा क्षणार्धात या सर्वांचा निकाल लागतो. मग ते धन खरे कोणाचे आहे त्याचा निर्णय लागतो. कबीर म्हणतो, हे संतजनहो, ऐका -- माझे माझे असे करणे व्यर्थ होय. (जगात काहीच कोणाचं नाही.) इतकेच काय पण मृत्यू झाल्यावर मुडद्याचे कातडेही खरवडून ओरबाडून डोम (मांग) घेऊन जातो. आणि कमरेची साखळी, आणि नेसूचे वस्त्रसुद्धा, इथेच राहते. प्रेत जाळीत असता सर्वकाही काढून घेतले जाते. म्हणून शेवटच्या वेळी लंगोटीसुद्धा काढून टाकली जाते.

देहाबरोबर काहीही असत नाही. असते ते सारे इथेच राहते, असे कबीस म्हणावयाचे आहे.

## (पंधरा)

**हरि नांव न जपसि गंवारा ।**
**क्या सोचहि बारंबारा ।। टेक ।।**
**पंच चोर गढ़ मंझा । गढ़ लूटहिं दिवसउ संझा ।।**
**जउ गढ़पति मुहकम होई । तौ लूटि सकै ना कोई ।।१।।**
**अंधियारै दीपक चहिऐ । तब बस्तु अगोचर लहिऐ ।**
**जब बस्तु अगोचर पाई । तब दीपक रहा समाई ।।२।।**
**जौ दरसन देखा चहिऐ । तौ दरपन मांजत रहिऐ ।।**
**जब दरपन लागै काई । तब दरसन किया न जाई ।।३।।**
**का पढ़िएं का गुनिएं । का बेद पुराना सुनिएं ।।**
**पढ़े गुनें क्या होई । जउ सहज न मिलिऔ सोई ।।४।।**
**कहै कबीर मैं जाना । मैं जाना मन पतियाना ।।**
**पतियाना जौ न पतीजै । तौ अंधे कौं का कीजै ।।५।।**

हे गावंढळ माणसा! तू हरीचे नाव जपत नाहीस, आणि कसला असा सारखा विचार करीत बसला आहेस? शरीररूपी गडावर पाच चोर (पंचविकार अथवा पाच ज्ञानेंद्रिये) आहेत आणि ते त्याला लुटीत राहिले आहेत (नित्य शरीराची ताकद कमी करीत असतात). जर गडकरी किल्लेदार मन) कर्तव्यतत्पर असेल तर कोणीही गड लुटू शकणार नाही. अंधारात दीप (ज्ञानप्रकाश) हवा. असे असेल तरच न दिसणारी वस्तू (परमात्मा) दिसू शकेल. जेव्हा ती अगोचर वस्तू मिळते, तेव्हा दिव्याचे काम संपून जाते. (तेव्हा ज्ञानाचीही

आवश्यकता उरत नाही.) जर दर्शन घ्यावयाचे असेल तर (मनाचा) आरसा स्वच्छ करीत राहिले पाहिजे. जेव्हा जेव्हा आरसा मळकट बनतो (चित्तात विकार उत्पन्न होतात) तेव्हा चेहरा नीटसा दिसत नाही. आपले स्वतःचे रूप व्यवस्थित पाहता येत नाही. वाचण्यालिहिण्याने आणि वेद-पुराण ऐकून काय लाभ होतो? जर तो (परमात्मा अथवा ज्ञान) लिहिण्यावाचण्यानेही सहजासहजी प्राप्त होणार नसेल तर काय उपयोग? कबीर म्हणतो, मला तर वस्तुस्थिती कळून आली. मला वास्तवाची जाणीव झाली आहे, असे माझे मन सांगते आहे. ज्याला प्रचिती (साक्षात्कार) घडला आहे त्यावर जर कोणी विश्वास ठेवणार नसेल तर त्या अंधळ्यास (विश्वासहीनास, विवेकहीनास) काय म्हणावे?

## (सोळा)

**मेरी मेरी करता जनम गयौ ।**
**जनम गयौ परि हरि न कह्यौ ॥टेक॥**
**बारह बरस बालपन खोयौ बीस बरस कछु तप न कियौ ।**
**तीस बरस तैं राम न सुमिरूयौ फिरि पछिताना बिरिध भयौ ॥१॥**
**सूखे सरवरि पालि बंधावै लूनें खेति हठि बारि करै ।**
**आयौ चोर तुरंगहिं लै गयौ मोहड़ी राखत मुगध फिरै ॥२॥**
**सीस चरन कर कंपन लागे नैन नीरु असराल बहै ।**
**जिभ्या बचन सूध नहिं निकसै तब सुक्रित की बात कहै ॥३॥**
**कहै कबीर सुनहु रे संतौ धन संच्यौ कछु संगि न गयौ ।**
**आई तलब गोपालराइ की माया मंदिर छांडि चल्यौ ॥४॥**

"मी-माझे" करता करता सर्व आयुष्य निघून गेले. आयुष्य संपत आले, पण हरीचे नामस्मरण काही अजून केले नाही. जीवनाची बारा वर्षे बालपणात घालविली. वीस वर्षांपर्यंतही काही तप-तपस्या घडली नाही. तीस वर्षेपावेतो रामाचे स्मरण केलेच नाही. नंतर पश्चात्ताप करायचा की, आता वृद्ध झालो! तलाव सर्व सुकून गेल्यानंतर आता तू त्याला बंधारा घालीत बसला आहेस. खाऊन सरलेल्या शेताची आता राखण करतो आहेस. (वेळ तर केव्हाच निघून गेली आहे. तुला आता 'पश्चात् बुद्धी'चे दुःख होते आहे.) चोर आला, घोडा चोरून घेऊन गेला. आणि आता मागाहून मूर्खासारखा तू त्याच्या तोंडावर बांधायची जाळी घेऊन फिरतो आहेस. वार्धक्यामुळे जेव्हा डोके आणि हातपाय थरथर कापू लागले, डोळ्यांतून सारखे पाणी येऊ लागले, जिव्हेने शुद्ध बोलणे अशक्य झाले तेव्हा कोठे आता तू चांगले वागायचा विचार करू लागला आहेस. कबीर म्हणतो, हे संतजनहो, ऐका, लोकांनी संपत्ती जमविली, परंतु जेव्हा अंतकाळ आला तेव्हा काहीही बरोबर घेऊन जाणे शक्य झाले नाही. गोपाळरायाकडून जेव्हा बोलावणेच आले, तेव्हा धन-धाम सारे सोडून चालू लागले.

## (सतरा)

**मन रे संसार अंध कुहेरा ।**
**सिरि प्रगटा जम का पेरा ॥टेक॥**
**बुत पूजि पूजि हिंदू मूए तुरुक मुए हज जाई ॥**
**जटा धारि जोगी मुए तेरी गति किनहुं न पाई ॥१॥**
**कवित पढ़े पढ़ि कबिता मूए कापड़ी कैदारै जाई ।**
**केस लूंचि लूंचि मुए बरतिया इनमैं किनहुं न पाई ॥२॥**
**धन संचंते राजा मूए गड़िले कंचन भारी ।**
**बेद पढ़े पढ़ि पंडित मूए रूप देखि देखि नारी ॥३॥**
**राम नाम बिनु सभै बिगूते देखहु निरखि सरीरा ।**
**हरि के नाम बिनु किनि गति पाई कहै जुलाह कबीरा ॥४॥**

बा, मना! हे जग गडद अंधाराने भरलेले आहे. परंतु, डोक्यावर यमाचा फास स्पष्ट दिसून येतो. मूर्तिपूजा करून करून हिंदू मरून गेले. हाजच्या यात्रेस जाऊन जाऊन मुसलमान मरून गेले. योगी जटा धारण करीत राहिले आणि मेले. परंतु, तुझा शोध कोणासही लागला नाही. कविगण काव्य वाचून-म्हणून नष्ट झाले; कापडी संन्यासी केदारनाथाची वारी करून करून मेले, केस उपटून काढून काढून व्रत करणारे जैन मरून गेले;–यांपैकी कोणीही तुला प्राप्त करून घेऊ शकला नाही. धनदौलत साठवीत राजेमहाराजे मरून गेले. सोन्याचा प्रचंड साठा जमिनीतच गाडलेला राहिला. वेदपठन करून करून पंडित मरून गेले. रूप पाहून पाहून त्या सौंदर्याचा गर्व बाळगणाऱ्या सुंदर स्त्रियाही मरून गेल्या. रामाशिवाय सारे नष्टभ्रष्ट झाले. -- आपल्याच शरीराचे नीटपणाने निरीक्षण-परीक्षण करून या गोष्टीचे नीट आकलन करून घ्या. कोष्टी कबीर म्हणतो, हरीच्या नामस्मरणाशिवाय कोणाला बरे सद्गती लाभली?

## (अठरा)

**जतन बिनु मिरगनि खेत उजारे ।**
**टारे टरत नहीं निस बासुरि बिडरत नाहिं बिडारे ॥टेक॥**
**अपनैं अपनैं रस कै लोभी करतब न्यारे न्यारे ।**
**अति अभिमान बदत नहिं काहू बहुत लोग पचि हारे ॥१॥**
**बुधि मेरी किखी गुर मेरौ बिझुका अक्खिर दोइ रखवारे ।**
**कहे क़बीर अब चरनन देइहौं बेरियां भली संभारे ॥२॥**

राखण (साधना) न केल्यामुळे पशूंनी (पंचविकारांनी) सर्व शेत (शरीर) खाऊन टाकले. रात्रंदिवस आता हटवूनही हटत नाहीत. बिचकावण्याचा प्रयत्न करूनही

बिचकत नाहीत. प्रत्येक जण आपापल्या स्वादासाठी लोभी बनला आहे. सर्वांची करणीही निरनिराळी आहे. (कोणी पीक तोडून टाकतो, कोणी जमीन खणून टाकतो). बरेचसे लोक हैराण झाले आहेत. पण अत्यंत गर्वामुळे हे लोक कोणाला सांगत नाहीत. परंतु, माझी शेती बुद्धाची आहे. त्यामध्ये गुरूचे बुजगावणे उभे केले आहे. रामनामाची दोन अक्षरे राखणदाराचे काम करीत आहेत. कबीर म्हणतो, मी अगदी योग्य वेळी सावरलो आहे, रक्षण केले आहे. आता शेती खाऊ देणार नाही.

## (एकोणीस)

**काया बौरी चलत प्रान काहे रोई ।**
**कहत हंस सुन काया बौरी मोर तोर संग न होई ॥टेक॥**
**काया पाइ बहुत सुख कीन्हां नित उटि मलि मलि धोई ।**
**सो तन छिया छार होइ जैहै नाउं न लेइ है कोई ॥१॥**
**सिव सनकादि आदि ब्रह्मादिक सेस सहस मुख जोई ।**
**जिन जिन देह धरी त्रिभुवन मैं थिर न रहा है कोई ॥२॥**
**पाप पुन्नि दोइ जनम संघाती समुझि देखु नर लोई ।**
**कहै कबीर प्रभु पूरन की गति बूझै बिरला कोई ॥३॥**

हे वेडे शरीर प्राण निघून जात असता का बरे रडत असते? हंस (आत्मा) म्हणतो, – हे वेड्या शरीरा, ऐक, तुझा-माझा सहवास टिकणारा नाही. शरीर प्राप्त झाल्यावर मी (जीव) खूप सुख उपभोगले. नित्य उठून त्यास घासून-पुसून स्वच्छ करीत राहिलो. परंतु, हे शरीर राखरांगोळी होऊन जाईल, आणि त्याचे नावसुद्धा कोणी घेणार नाही. शिव-सनकादी आणि ब्रह्मादिक, जे जे कोणी हे जग निर्माण करणारे आहेत, आणि ज्याला हजार मुखे आहेत असा जो तो शेष आहे... यांपैकी ज्याने ज्याने म्हणून त्रिभुवनात देह धारण केला तो कोणीही स्थिर राहू शकला नाही, नश्वरच ठरला. पाप अन् पुण्य हेच दोघे (जीवनसाथी) आहेत (शरीर नव्हे). हे सामान्यजन हो, ही गोष्ट जाणून घ्या, समजून घ्या. कबीर म्हणतो, त्या पूर्ण ब्रह्माची, ईश्वराची गती कोणी विरळाच जाणू शकतो.

## (वीस)

**हम न मरैं मरिहै संसारा ।**
**हमकौं मिला जोआवनहारा ॥टेक॥**
**साकत मराहिं संत जन जीवहिं। भरि भरि राम रसाइन पीवहिं ॥१॥**
**हरि मरिहै तौ हमहूं भरिहै। हरि न मरै हम काहेकौ मरिहै ॥२॥**
**कहै कबीर मन मनहिं मिलावा। अमर भए सुखसागर पावा ॥३॥**

आम्ही मरणार नाही. हे सर्व जग मरून जाईल. याचे कारण, आम्हांला जीवन देणारा तो प्रभू राम भेटलेला आहे. शाक्त मरून जातो. संतजन अमर होतात; कारण ते राम-रसायन (जी जीवन देणारी औषधी आहे) घोटून प्राशन करीत असतात. हरी जर मरणार असेल तर आम्हीही मरू. हरी जर मरणार नाही तर आम्ही कसे मरू? कबीर म्हणतो, आम्ही आमचे मन त्या मनांच्या मनामध्ये अर्थात परमात्म्याशी एकरूप करून टाकले आहे. (अशा रीतीने) आम्ही तर अमर झालोच, कारण आम्हांला तो सुखसागर केव्हाच भेटलेला आहे!

## (एकवीस)

**अब हम सकल कुसल करि माना ।**
**सांति भई जब गोबिंद जाना ॥टेक॥**
**तन महिं होती कोटि उपाधि । उलटि भई सुख सहज समाधि ॥१॥**
**जन तैं उलटि भया है राम । दुख बिनसे सुख किया बिसराम ॥२॥**
**बैरी उलटि भए है मीता । साकत उलटि सजन भए चीता ॥३॥**
**आपा जानि उलटिलै आप । तौ नहिं ब्यापै तीन्यू ताप ॥४॥**
**अब मन उलटि सनातन हूवा । तब आना जब जीवत मूवा ॥५॥**
**कहै कबीर सुख सहजि समावउं । आप न डरउं न और डरावउं ॥६॥**

जेव्हापासून मी गोविंदास जाणून घेतले आहे तेव्हापासून शांती लाभलेली आहे, स्थिरता आलेली आहे. आता मला सर्वत्र कुशल अन आनंदी वातावरण दिसून येते आहे. शरीरात ज्या कोट्यवधी व्याधी होत्या, त्या सर्व परिवर्तन होऊन सहज समाधीच्या सुखात सामावून गेल्या. यम (मृत्युदेव) बदलून राम (जीवन देणारा देव) बनला. दुःखे नाहीशी झाली. सुखात न्हाऊन निघालो. शत्रू बदलून मित्र बनले. शाक्त बदलले आणि त्यांचे चित्त शुद्ध झाले. आत्मस्वरूपास जाणून घेऊन जर आपण आपले मन परिवर्तित केले तर त्यास त्रिविध ताप त्रास देत नाहीत. आता मन परिवर्तित होऊन अमर झाले आहे (जीवन्मृत झालो) तेव्हाच हे जाणू शकलो. कबीर म्हणतो, मी सहजसुखात मग्न झालो आहे. आता कोणाची मला भीती वाटत नाही आणि कोणाला भीतीही दाखवीत नाही (भेद-दृष्टी नष्ट झाली आहे).

या पदात कबीराने मनःसाधनेचे रहस्य स्पष्ट करून सांगितले आहे. या पदाच्या शेवटच्या दोन ओळींमध्ये त्यांनी ते रहस्य उलगडून दाखविले आहे. मनाची प्रवृत्ती साधारणपणे बाहेरच्या मोहाने आकृष्ट होण्याकडे असते. त्या प्रवृत्तींना विषयांपासून पुन्हा ओढून अंतरी साठविण्यास 'मन उलटविणे' म्हणतात. मन उलटल्यावर, उन्मन झाल्यावर, त्यामध्ये फार मोठी शक्ती येते. ते अत्यंत बलवान बनते. जेव्हा कोणी जिवंतपणीच मरून जातो किंवा गीतेच्या शब्दात सांगायचे तर स्थितप्रज्ञ होतो तेव्हाच हे शक्य होते. गीतेत म्हटले आहे –

**यदा संहरते चाऽयं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥**

अर्थात, जो आपल्या इंद्रियांना त्यांच्या विषयवासनेपासून कासवाच्या शरीराप्रमाणे सर्व बाजूंनी संकोचून घेतो, त्याची बुद्धी स्थिर होऊन जाते, तो स्थितप्रज्ञ बनून जातो.

## (बावीस)

**रामुराय चली बिनावन माहो ।**
**घर छोड़ जाइ जुलाहौ ॥टेक॥**
**गज नव गज दस गज उनइस की पुरिया एक तनाई ।**
**सत सूत दै गंड बहत्तरि पाट लागु अधिकाई ॥१॥**
**गजैं न मिनिऐ तोलि न तुलिऐ पहजन सेर अढ़ाई ।**
**अढ़ाई मैं जे पाव घटै तौ करकच कर घरहाई ॥२॥**
**दिन की बेठ खसम सौं बरकस तापर लगी तिहाई ।**
**भींगी पुरिया घर ही छांड़ी चला जुलाह रिसाई ॥३॥**
**छोछी नली काम नहिं आवै लपटि रही उरझाई ।**
**छांडि पसार राम भजु बउरे कहै कबीर समझाई ॥४॥**

सुंदरी (माया) सुंदर वस्त्र विणण्यासाठी (कर्म करण्यासाठी) चाललेली आहे. परंतु, कोष्टी मात्र घर सोडून चालला आहे. अर्थात, मन कर्माच्या जंजाळामुळे विटून गेले आहे. शरीराचा प्रपंच असा आहे — नऊ वार (नऊ साड्या) आणि दहा वार (दहा इंद्रिये) अशा एकोणीस वारांचे एक वस्त्र ताणले गेले आहे (शरीर). नंतर सात सुतांचे (सप्त धातू) बहात्तर गंडे (बहात्तर कप्पे) बांधले गेले, यामुळे हा तागा गुंडाळण्यासाठी फार मोठी आरी आवश्यक होऊन बसली (प्रपंचाचा विस्तार वाढला). या आरीस (शरीरास) गजाने मोजणे शक्य नाही, तराजूवर तोलणे शक्य नाही (शरीररचनेचे रहस्य जाणून घेता येत नाही). यासाठी अडीच शेराची खळ (खुराक) आवश्यक असते. अडीच शेरास थोडीजरी ही खळ किंवा खुराक कमी पडला तर घरधनीण कचकच करू लागते. खळ कमी लावण्याने कपड्याचे वजन कमी होऊन जाते. म्हणून तोट्याचा अंदाज करून ती तक्रारखोर (चहाडखोर) स्त्री (रामुराय) त्याच्याशी झगडत राहते. खळ लावताना थोडी जरी कमी पडली तरी घरधनीण किचकिच करते की, आणखी आणायची कोठून? शरीराच्या दृष्टीने अर्थ असा झाला — अडीच शेराच्या खुराकामध्ये थोडी जरी कमतरता पडली तरी खळबळ उडून जाते. दिवसभर खटून मेहनत केल्यावरच (सावधान चित्त राखून साधना करण्यानेच) मालकाला बरकत प्राप्त होते (प्राप्ती होते अर्थात प्रारब्ध-कर्माचीही वृद्धी हाते). त्यातून कमाईचा तिसरा वाटा द्यावा लागत असतो (त्रिविध ताप भोगावे लागतात). इतका सारा प्रपंच

करता करता विटून गेलेला कोष्टी ते ताणलेले वस्त्र नळीवर तसेच टाकून घर सोडून वैतागाने निघून चालला (शरीराच्या कटकटीमुळे कष्टी होऊन मनाने खट्टू होत चालला), आणि मग पोकळ नळीने कपडा विणला जात नाही, कारण ती जागा ताणण्याच्या नळीत अडकून बसलेली असते. (रिक्त मनाने कर्म करता येत नाही. ते आपल्या-आपल्यातच गुरफटून राहते.) म्हणून कबीर समजावून सांगतो, हे मूर्खा, हा सारा पसारा (शरीराचा) सोडून देऊन रामाचे भजन कर.

रामुराय–पूर्वीच्या काळी वेश्यांची नावे अशीच असत. (उदाहरणार्थ–परवीनराय, सुजानराय इत्यादी). कबिराने वास्तविक मायेच्या अर्थाने या शब्दांचा प्रयोग केला आहे : "ही पाहा! रामुराय नामक वेश्या सुंदर वस्त्र विणण्यासाठी निघाली आहे!" 'माहो' हे एक प्रकारचे मौल्यवान रेशमी वस्त्र असते. 'गज नव' म्हणजे नऊ नाड्या. त्या अशा : (१) इडा किंवा चंद्र नाडी (२) पिंगला किंवा सूर्य नाडी (३) सुषुम्ना किंवा मध्य नाडी (४) गांधारी (५) हस्तिजिह्वा (क्रमाने उजव्या आणि डाव्या डोळ्याची नाडी) (६) पूषा (७) पयस्विनी (क्रमाने उजव्या आणि डाव्या कानाची नाडी) (८) लकुहा (९) अलम्बुषा (क्रमशः गुदद्वार आणि लिंग या जवळची नाडी). शरीरासंबंधीची 'नवनाडी, बहात्तर घरे' ही कल्पनाही फार जुन्या काळापासून प्रसिद्ध आहे. 'दस गज' म्हणजे दहा इंद्रिये. 'सात सूत' म्हणजे सप्त धातू (रक्त, मांस, मज्जा, वसा, अस्थी, शुक्र, रस). 'गंड' म्हणजे गाठ. कोष्ट्यांच्या भाषेमध्ये लाकडातील गराने भक्कम केल्या जाणाऱ्या सुताच्या एकेका गठ्ठ्यास 'गंडा' असे म्हणतात. असे 'गंडे' जितके जास्त तेवढी पुरिया (तागा विणण्यापूर्वी ज्यावर पसरायचा ती मोठी नळी) रुंद होते. येथे सात सात सुतांचे बहात्तर गंडे सांगितले आहेत. याचा अर्थ शरीराचे बहात्तर गाठी किंवा कप्पे असा आहे.

'पहजन सेर अढाई' - अडीच शेर खळ; शरीराच्या संदर्भात अडीच शेराचे खाद्य असा अर्थ. नास्ता, भोजन इत्यादी सर्व मिळून प्रत्येक व्यक्ती दररोज साधारणपणे अडीच शेर खाद्य खाते असे मानतात. वैतागाने लोक म्हणतात की, "अढ़ैया भर चढ़ा लिया (अडीच शेराचा समाचार घेतला), कामकाज कौड़ी का भी नहीं किया (आणि काम मात्र कवडीचेही केले नाही)."

## (तेवीस)

**राम सुमिरि नर बावरै ।**
**तोरी सदा न देहियां रे ।। टेक ।।**
**यहु माया कहौ कौन की काकै संग लागी रे ।**
**गुदरी सी उठि जाइगी चित्त चेति आभागी रे ।।१।।**
**सौनैं की लंका बनी भइ धूर की धानी रे ।**
**सोइ रावन की साहिबी छिन मांहिं बिलानी रे ।।२।।**

**बारह जोजन के बिखै चले छत्र की छहियां रे ।**
**सोइ जरिजोधन कह गये मिली माटी महियां रे ॥ ३॥**
**कहै कबीर पुकारि है इहां कोइ न अपना रे ।**
**यहु जियरा चलि जाइगा जस रैंनि का सपना रे ॥४॥**

वेड्या माणसा! रामाचे नामस्मरण कर. ज्या तुझ्या शरीराचा तुला एवढा गर्व आहे ते सदासर्वकाळ राहणारे नाही. ही संपत्ती सांग पाहू कोणाची आहे? आणि ही कोणाच्या हाती कायम राहिली आहे? जसा बाजार भरतो आणि संपून जातो तसेच तुझ्या या शरीराचे होणार आहे. हे हतभागी माणसा, याचा जरा मनाशी विचार कर. एवढी मोठी सोन्याची लंका तयार झाली होती, पण तीही धुळीला मिळाली. त्या रावणाचा रुबाब क्षणात नाहीसा झाला. बारा योजनेपर्यंत विस्तारलेल्या थाटामाटासह जो छत्रछायेत गर्वाने चालत असे तो दुर्योधनही मातीत मिळून कुठे बरे गेला? कबीर आवर्जून सांगतो आहे – येथे कोणी कोणाचे नाही. ज्याप्रमाणे रात्रीचे स्वप्न रात्रीतच विरून जाते, तसा हा जीव निघून जाईल.

## (चोवीस)

**चारि दिन अपनी नौबति चले बजाई ।**
**उतानैं खटिया गड़िले मटिया संगि न कछु लै जाइ ॥टेक॥**
**देहरी बैठी मेहरी रोवै द्वारै लगि सगी माई ।**
**मरहट लौ सब लोग कुटुंब मिलि हंस अकेला जाइ ॥१॥**
**वहि सुत वहि बित वहि पुर पाटन बहुरि न देखै आइ ।**
**कहत कबीर भजन बिन बंदे जनम अकारथ जाइ ॥२॥**

चार दिवस आपला गाजावाजा करून लोक निघून जातात. मग पालथ्या खाटेवर (तिरडीवर) घालून त्यांना घेऊन जाऊन गाडून टाकतात. बरोबर कोणीही काहीही घेऊन जात नाही. उंबऱ्यावर बसून पत्नी आक्रोश करते. दारापर्यंत माया करणारी सख्खी आई येते. स्मशानापर्यंत सर्व आप्तस्वकीय मिळून येतात. पुढे हंस (आत्मा) एकट्यानेच प्रवास करतो. तो पुत्र, ते धन, ती नगरी - घरदार पुन्हा फिरून पाहता येत नाही. कबीर म्हणतो, हे दासा! भजनाविना संपूर्ण जन्म निष्कारण वाया चालला आहे.

## (पंचवीस)

**मन रे मनहिं उलटि समाना ।**
**गुर परसादि अकिलि भई अवरै नातरु था बेगाना ॥टेक॥**
**उलटै पवन चक्र खटु भेदे सुरति सुन्नि अनुरागी**
**आवै न जाइ मरै नहिं जीवै ताहि खोजि बैरागी ॥१॥**
**नियरै दूरि दूरि फुनि नियरै जिनी जैसा करि माना ।**
**औलौती का चढ़ा बरेंडै जिनि पीया तिनि जाना ॥२॥**

**तेरी निरगुन कथा कवन सौ कहिअ है कोई चतुर बिबेकी ।**
**कहै कबीर गुर दिया पलीता सो झल बिरलै देखी ॥३॥**

मन उलटून आता मनामध्येच सामावून गेले आहे. गुरूच्या कृपेनेच मला ही बुद्धी प्राप्त झाली. नाहीतर मी या रहस्यापासून वंचितच राहिलो असतो. (याविषयी मी अनभिज्ञ होतो.) वायूस उलटवून अर्थात श्वासोच्छ्वासास काबूत ठेवून अथवा प्राणायामाच्या साधनेने सहा चक्रांचा भेद केला तेव्हा मन शून्य (सहज दशा, उन्मनी अवस्था अथवा स्थितप्रज्ञता) स्थितीकडे पोहोचले. हे साधका, ज्याच्यामुळे आवागमन आणि जीवनमरणापासून मुक्ती मिळते त्याचा शोध घे. जवळ असूनही तो जवळ आहे. ज्याने जसे त्यास समजून घेतले (तसा तो आहे.) पन्हाळीतील पाणी जर आधाराच्या खांबावर गळू लागले तर जो कोणी त्याचा स्वाद घेईल त्यालाच तो स्वाद कळून येईल. (जो मन उलटविण्याची साधना समजू शकतो, त्यालाच त्या अद्भुत स्थितीचा आनंद कळतो. अन्य कोणास कळू शकत नाही.) ही तुझी निर्गुणाची कहाणी कोणाला बरे सांगावी? कोणी आहे का असा ज्ञानी-पुरुष? कबीर म्हणतो, गुरूने जी ज्योती दिलेली आहे, तिचा प्रकाश एखादाच पाहू शकतो. (अर्थात त्या ज्योतीतून असा काही प्रकाश बाहेर पडतो की जो अपूर्व आहे. अन्य प्रकाशज्योतीमध्ये तसा असत नाही. तात्पर्य, या विशिष्ट प्रकारच्या साधनेने अद्भुत दृश्ये पाहावयास मिळतात.)

'औलौती का चढा बरेंडै' - 'ओलती' अथवा 'औरी' छपराच्या कडेने जेथून पाणी दोन्ही बाजूंना पडते, त्यास म्हणतात (मराठी पन्हाळ). ज्या मुख्य आधाराच्या खांबावर छप्पर मधोमध पेललेले असते, त्याला 'बँडेर' किंवा 'बलिंडा' असे म्हणतात. छपराचे पाणी या मध्याकडून पन्हाळीकडे धाव घेत असते. पन्हाळीचे पाणी आधाराच्या खांबाच्या वर चढणे याचा कबिराला अभिप्रेत असलेला अर्थ आहे, मन उलटविणे अर्थात अंतर्मुख होणे.

## (सव्वीस)

**मन मोर रहटा रसना पिऊरिया ।**
**हरि कौ नाउं लै काति बहुरिया ॥टेक॥**
**चारि खूंटी दोइ चमरख लाई । सहजि रहटवा दियौ चलाई॥१॥**
**छौ मास तागा बरिस दिनु कुकुरी । लोग बोलैं भल कातल बपुरी॥२॥**
**कहै कबीर सूत मल काता । रहटा नहीं परम पद दाता ॥३॥**

माझे मन चरख्याप्रमाणे आहे. माझी जिव्हा जणू पेळू आहे. हे साधिके (विरहिणी, जीवात्म्या)! तू (या चरख्याने) हरिस्मरणरूपी सूत कात (अर्थात, नामस्मरण कर). चार खुंट्या लावून (अंतःकरण - चतुष्यावर नियंत्रण राखून) आणखी दोन

चामड्याच्या चकत्या लावून ठेव. (इडा आणि पिंगला ना किंवा येणारा – जाणारा श्वासोच्छ्वास काबूत ठेवून) सहजपणाने या मनरूपी चरख्यास चालवीत राहा. सहा महिने सूत काढले (मन एकाग्र केले) आणि बाराही महिने त्यास जर गुंडाळून ठेवलेस (मनास अंतर्मुख केलेस) तर लोक म्हणतील, या दीन साधिकेने (जीवात्म्याने) सूतकताई चांगली केली आहे (भगदन्मनाची साधना चांगली केली आहे). कबीर म्हणतो, आम्ही असेच सुंदर सूत कातले आहे (चांगली साधना केली आहे). म्हणून हा माझा चरखा साधासुधा नाही. हा परमपद देणारा आहे. (अर्थात, मन साधारणशी बाब नाही, ती मुक्ती देऊ शकणारी एक महत्त्वाची बाब आहे.)

'रहटा' - सूत कातण्याचा चरखाही सारखा भ्रमण करीत राहणारा आहे. म्हणून कबीर मनाला त्याची उपमा देतात. 'चार खूँटी' - चरख्यामध्ये चार खुंट्या लावलेल्या असतात. दोन मागच्या मोठ्या चाकाकडे आधार म्हणून आणि दोन पुढच्या बाजूस तकली सांभाळण्यासाठी असतात. वास्तविक, येथे चार खुंट्या म्हणजे अंतःकरण-चतुष्टय अर्थात मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार असा अर्थ अभिप्रेत आहे. 'चमरख' म्हणजे चामड्याची चकती. या चकतीवर चरख्याची सूत कातण्याची टोकदार तकली बसविलेली असते. दोन्ही खुंट्यांना अशा चामड्याच्या चकत्या बसवितात. योगाच्या संदर्भात या दोही चकत्या म्हणजे इडा आणि पिंगला या नाड्या होत. मन स्थिर करण्यासाठी 'प्राण' (पवन) ही स्थिर करण्याची आवश्यकता असते. जेव्हा इडा आणि पिंगला या एकत्र येतात तेव्हाच हे शक्य होते, कारण या नाड्यांचा संबंध दोन्ही नाकपुड्यांशी आहे असे मानले जाते. 'कुकुरी' म्हणजे सूत गुंडाळण्याचे साधन. चरख्याच्या तकलीवर काढून झालेले सूत त्यावर पुन्हा गुंडाळून ठेवतात. योगाच्या संदर्भात येथे अर्थ असा होईल - ज्याप्रमाणे सूत पुन्हा दुसरीकडे गुंडाळून घ्यावे लागते त्याप्रमाणे बारा पाकळयांच्या हृदयकमलावर अथवा अनाहत चक्रावर ध्यानधारणा करावयास हवी. येथेच प्रभूचा निवास आहे.

## (सत्तावीस)

**लोकस तुम ज कहत हौ नंद कौ नंदन नंद कहौ धूं काकौ रे ।**
**धरनि अकास दोऊ नहिं होते तब यहु नंद कहाँ थौ रे ॥टेक॥**
**लख चौरासी जीअ जोनि महिं भ्रमंत भ्रमंत नंद थाकौ रे ।**
**भगति हेतु औतार लियौ है भागु बड़ौ बपुरा कौ रे ॥१॥**
**जनमैं मरै न संकटि आवै नांव निरंजन जाकौ रे ।**
**दास कबीर कौ ठाकुर ऐसौ जाकौ माई न बापौ रे ॥२॥**

लोकहो! तो कृष्ण नंदनंदन आहे, असे तुम्ही म्हणता, मग सांगा पाहू नंद कोणाचा पुत्र आहे ते! कल्पांतराच्या वेळी जेव्हा पृथ्वी आणि आकाश दोन्ही नव्हती, तेव्हा

हा नंद – ज्याने कृष्णास अर्थात परब्रह्मास निर्माण केले - तो कोठे होता? चौऱ्याऐंशी लक्ष योनींच्या फेऱ्यांत भ्रमंती करता करता नंद थकून गेला. त्याच्या भक्तीने प्रसन्न होऊनच भगवंताने तेथे अवतार धारण केला - त्या बिचाऱ्याचे हेच मोठे भाग्य! जो जन्मत नाही, मरत नाही, संकटात सापडत नाही आणि जो निरंजन (निराकार) आहे, ज्याला मातापिता नाहीत, असा कबीराचा स्वामी आहे.

## (अठ्ठावीस)

**मोहिं बैराग भयौ ।**
**यहु जिउ आइ रे कहां गयौ ॥टेक॥**
**आकासि गगनु पातालि गगनु है दह दिसि गगनु रहाईले ।**
**आनंद मूल सदा पुरखोतम घट बिनसै गगनु न जाईले ॥१॥**
**पंच तत्त मिलि काया कीनी तत्त कहां तैं कीनु रे ।**
**करमबद्ध तुम जीउ कहत हौ करमहिं किन जिउ दीनु रे ॥२॥**
**हरि महि तनु है तन महिं हरि है सरब निरंतरि सोइ रे ।**
**कहै कबीर हरि नाउं न छांड़उं सहजैं होइ सु होइ रे ॥३॥**

हा प्राण येऊन पुन्हा कोठे जाऊन सामावतो? ह्याचा विचार करता करता मला वैराग्य प्राप्त झाले. आकाशी, अर्थात वर गगन आहे. पाताळात, अर्थात खालीही गगन आहे. दाही दिशांना गगनच आहे. ह्याचप्रमाणे तो पुरुषोत्तम (परमात्मा) सुद्धा अनंतकाळपर्यंत टिकणारा आणि आनंदनिधान आहे. घडा नष्ट होऊन जातो. परंतु घड्याचे आकाश (घटाकाश) नष्ट होत नाही (ते मोठ्या आकाशात सामावून जाते). पंचतत्त्वांचे मिळून शरीर तयार होते. परंतु असा विचार करावा की, ही तत्त्वेतरी कोठून तयार केली गेली? जीव कर्मबंधनात बद्ध आहे असे तू म्हणतोस, परंतु विचार करून पाहा जरा. या जीवाला तरी कर्मे कोणी दिली? अर्थात परमात्म्यानेच ही तत्त्वे उत्पन्न केली आणि त्यानेच हे कर्माचे जाळे रचले. परमात्म्यामध्ये शरीर आहे. (जीव परमात्म्यावर स्थिर झाला आहे). शरीरातही परमात्मा आहे––तोच सर्वत्र अखंड रीतीने सामावलेला आहे. कबीर म्हणतो, काहीही झाले तरी मी सहजासहजी नामस्मरणाचा मार्ग सोडणार नाही; मग वाटेल ते होवो.

## (एकोणतीस)

**कबीरा बिगर्‍यौ राम दुहाई ।**
**तुम्ह जिनि बिगरौ मेरै भाई ॥टेक॥**
**चंदन के ढिंग बिरिख जु भैला । बिगरि बिगरि सो चंदन ह्वैला ॥१॥**
**पारस कौं जे लोह छिवैला । बिगरि बिगरि सो कंचन ह्वैला ॥२॥**

**गंगा मैं जे नीर मिलैला । बिगरि बिगदि गंगोदिक ह्वैला ॥३॥**
**कहे कबीर जे राम कहैला । बिगरि बिगरि सो रामहि ह्वैला ॥४॥**

हाय रे देवा! कबीर तर कामातून गेला. हे बंधो, तू असा वाया जाऊ नकोस!! चंदनाच्या जवळ जो वृक्ष होता तो हळूहळू बदलून गेला, स्वतः चंदनच होऊन गेला. पारसमण्यास स्पर्श करणारे लोखंड बदलत बदलत सोने होऊन जाते. गंगेमध्ये जे पाणी येऊन मिसळते ते गंगाजळ बनून जाते. कबीर म्हणतो, अगदी अशाच प्रकारे जो नित्य रामाचे स्मरण-चिंतन करतो तो बदलून (बिघडून) शेवटी स्वतः रामच होऊन जातो!

## (तीस)

**आसन पवन दूरि करि रउरा ।**
**छांड़ि कपट नित हरि भजि बौरा ॥टेक॥**
**का सींगी मुद्रा चमकाएं । का बिभूति सब अंग लगाएं ॥१॥**
**सो हिंदू सो मुसलमान । जिसका दुरुस रहे ईमान ॥१॥**
**सो जोगी जो धरै उनमनी ध्यान । सो ब्रह्मा जो कथै ब्रह्म गियान ॥३॥**
**कहै कबीर कछु आन न कीजै । राम नाम जपि लाहा लीजै ॥४॥**

हे साधका! तुझे हे आसन-प्राणायामाचे जंजाळ बस कर! आणि मिथ्या आचार, खोटेनाटे वागणे सोडून, हे मूर्खा! तू नित्य ईश्वराचे भजन कर. सर्व शरीराला राख फासून आणि शृंगी, मुद्रा घेण्याने काय साधणार आहे? ज्याचा विवेक (आणि वर्तणूक) योग्य राहिला तोच खरा हिंदू किंवा तोच खरा मुसलमान होय. (कारण धर्म कोणत्याही असला तरी त्यात प्रथम चारित्र्यावरच विशेष लक्ष दिले जाते. हाच खरा धर्माचा प्राण होय.) जो उन्मन (अंतर्मुख) होऊन चिंतन करतो तो खरा योगी होय. जो ब्रह्मज्ञान सांगू शकतो, तोच खरा ब्राह्मण होय. कबीर म्हणतो, केवळ रामनामाचा जप करून जीवन सफल करावयास हवे. आणखी काही करण्याची आवश्यकता नाही.

## (एकतीस)

**सार सुख पाइऐ रे।**
**रंगि रवहू आतमाराम ॥टेक॥**
**बनहिं बसें का कीजिऐ जौ मन नहीं तजै बिकार।**
**घर बन समसरि जिनि किया ते बिरला संसार॥१॥**
**का जटा भसम लेपन किएं कहा गुफा मैं बास।**
**मन जीतें जग जीतिणे जौ बिखिया तैं रहे उदास ॥२॥**

**काजल देइ सभै वोइ चखि चाहन मांहिं बिनान।**
**जिजि लोइन मन मोहिया ते लोइन परवान ॥३॥**
**कहै कबीर किया भइ पुर ग्यान कहा समझाइ।**
**हिरदै स्री हरि भेटिया अब मन अनत न जाइ ॥४॥**

हे मानव प्राण्या, तू आत्मारामाच्या रंगी रंगून जा. त्यामुळे मनुष्यप्राण्याला खरेखुरे सुखप्राप्त होऊ शकते. जर मन विकारांचा त्याग करीत नसेल तर मग वनामध्ये राहून काय करणार? घर आणि वन या दोहोंना समान लेखणारे लोक जगात फार थोडेच असतात. जटा वाढवून काय होणार? भस्म फासून तरी काय मिळणार? व गुहेत राहून तरी काय साधणार? मनावर विजय प्राप्त करण्याने जग जिंकता येते. जर कोणी विषय-विकारांपासून अलिप्त राहील तर जग जिंकता येते. सर्व जण डोळ्यांत काजळ घालतात. पाहण्याच्या पद्धतीतही वैशिष्ट्य असू शकते. परंतु ज्या दृष्टीने मन मोहित होते तीच दृष्टी चांगली मानली जाते. कबीर म्हणतो, गुरुजींची कृपादृष्टी झाली. त्यांनी ज्ञान समजावून सांगितले त्यामुळे हृदयी श्रीहरी विराजित झाला आहे-भेटला आहे. आता माझे मन अन्य कुठे जात नाही, अन्य काही भावत नाही.

## (बत्तीस)

**अल्लह राम जिऊं तेरै नाई ।**
**बंदे उपरि मिहरि करौ मेरै सांई ॥टेक॥**
**क्या लै मूड़ी भुइं सौ मारें क्या जल देह न्हवाए ।**
**खून करे मिसकीन कहावै गुनही रहै छिपाएं ॥१॥**
**क्या ऊजू जप मंजन कीएं क्या मसीति सिरु नाए ।**
**दिल महिं कपट निवाज गुजारै क्या हज काबै जाएं॥२॥**
**बाह्मन ग्यारसि करै चौबीसौं काजी महं रमजाना।**
**ग्यारह मास कहौ क्यूं खाली एकहि मांहिं नियाना॥३॥**
**जौ रे खदाइ मसीति बसतु है और मुलुक किस केरा।**
**तीरथि मूरति राम निवासी दुहु महिं किनहुं न हेरा॥४॥**
**पूरब दिसा हरी का बासा पच्छिमि अलह मुकामा ।**
**दिल महिं खोजि दिलै दिलि खोजहु इहंई रहीमा रामा ॥५॥**
**जेते औरति मरद उपाने सो सभ रूप तुम्हारा।**
**कबीर पुंगरा अलह राम का सोइ गर पीर हमारा ॥६॥**

हे अल्ला! हे राम! मी तुझ्या नामस्मरणाच्या आधारेच जगतो. हे स्वामी! या सेवकावर कृपा कर. जमिनीवर सतत डोके आपटून पाण्यात सारखे शरीर बुचकळून काय उपयोग? प्राणिहत्या करायची आणि वर नम्र म्हणवून घ्यायचे, आणि स्वतःचे सच्चे स्वरूप दडवून

ठेवायचे. (अल्लाचे किंवा भगवंताचे) जपतप करून किंवा मशिदीत डोके टेकवून तरी काय उपयोग? हृदयामध्ये दुष्ट बुद्धीचा नमाज सुरू आहे तर मग हाज आणि काब्याच्या यात्रेस जाऊन काय मिळणार? ब्राह्मण सर्व एकादश्या करतो. तिकडे मुल्ला रमजानचे (उपवासाचे) व्रत करतो. अकरा महिन्यांनी मग काय पाप केले आहे? सांग पाहू! एकाच महिन्यात काय सारे पुण्य प्राप्त करून झाले? अरे बाबा! खुदा (ईश्वर) जर मशिदीतच राहतो तर मग हा सारा बाकीचा प्रदेश कोणाचा आहे बरे? हिंदूंना वाटते, राम तीर्थस्थानी आणि मूर्तीत असतो. परंतु या दोहोंतही कोणी त्याला पाहिले नाही. (हिंदूंच्या मते) पूर्व दिशेस (जगन्नाथपुरी?) ईश्वराचा निवास आहे. (मुसलमानांच्या मते) पश्चिमेस (काबा?) अल्लाचा मुक्काम आहे. परंतु हे (अज्ञ) जनहो! त्याला मनातच शोधा. मनामध्ये शोधून पाहा. इथेच रहीम आहे. इथेच राम आहे. पूर्व किंवा पश्चिम दिशेस नव्हे. जेवढे म्हणून स्त्री-पुरुष उत्पन्न झाले ती सर्व त्याचीच रूपे होत. कबीर हा अल्लाचा आणि रामाचा बालक आहे. तोच आमचा गुरू आहे. तोच आमचा पीर आहे.

## (तेहतीस)

**मेरी जिभ्या बिस्नु नैंन नाराइन हिरद बसहि गोबिंदा ।**
**जम दुवार जब लेखा मांगै तब का कहसि मुकुंदा ॥टेक॥**
**तू बाह्मन मैं कासी क जोलहा चीन्हि न मोर गियाना।**
**तैं सब मागे भूपति राजा मोरै राम धियाना ॥१॥**
**पूरब जनम हम बाह्मन होते ओछे करम तप हीना ॥२॥**
**राम देव की सेवा चूका पकरि जुलाहा कीन्हा ॥२॥**
**हम गोरू तुम गुआर गुसांई जनम जनम रखवारे ।**
**कबहूं न पार उतारि चराएहु कैसे खसक हमारे ॥३॥**
**भौ बूड़त कछु उपाइ करीजै जौं तरि लंघे तीरा ।**
**राम नाम जपि मेरा बांधौ कहै उपदेश कबीरा ॥४॥**

माझ्या जिव्हेवर विष्णू (चे नाम) आहे. नयनांमध्ये नारायण (साठविलेला) आहे. हृदयी गोविंदाचा निवास आहे. यम दरवाजापाशी जेव्हा हिशेब मागू लागतो, तेव्हा फक्त तू मुकुंदाचे (ईश्वराचे) नाव घेतोस. (त्यावेळीच का तू मुकुंदाचे नाव घेतोस?) तू ब्राह्मण आहेस. मी काशीचा कोष्टी आहे. तू माझे ज्ञान जाणीत नाहीस. तू या जगातील राजेमहाराजांपाशी याचना करीत राहिलास. पण माझे लक्ष केवळ त्या रामापाशी आहे. पूर्वजन्मी मी ब्राह्मण होतो. त्यावेळी माझे भाग्य हीन झाले होतो – मी अभागी होतो आणि मी तपस्येने हीन बनलो होतो. त्यातून रामदेवाच्या सेवेत चूक झाली. त्याने मला पकडून या जन्मी कोष्टी करून टाकले. (तीच चूक तू पुन्हा करू नकोस; अन्यथा तुलाही माझ्यासारखे कोष्टी बनावे लागेल. असा अर्थ अभिप्रेत आहे.) मी पशू

आहे. आणि हे ब्राह्मण! तू माझा गवळी आणि गोस्वामी, अर्थात मालक आहेस. आमच्यासारख्या अज्ञ जनांचे जन्मोजन्मी रक्षण करणारा असा तू आहेस! परंतु, तू आम्हांला कधी पैलतीरावर नेले नाहीस किंवा विस्तीर्ण मैदानात चरायलाही सोडले नाहीस. अर्थात, नेहमी एका संकुचित क्षेत्रात ठेवलेस. आपल्या स्वार्थाचा विचार केलास. असला कसला तू आमचा स्वामी आहेस? भवसागरात बुडताना तू काहीतरी उपाय करायला हवेस. म्हणजे तूच हा भवसागर पार करून पैलतीराला जाऊ शकशील. रामनामाचा जप कर. त्याचा ध्यास धर. तुझ्यासाठी कबीर हाच संदेश देत आहे.

*विशेष* : पूर्वजन्मी आपण ब्राह्मण असूनही ईश्वराची आराधना करण्यात काहीतरी कुचराई घडली म्हणून आपल्याला या जन्मी कोष्टी व्हावे लागले, असे कबीरदास जेव्हा सांगतात तेव्हा त्यांना म्हणायचे आहे – (हे ब्राह्मणजनहो!) तुम्हीही या जन्मी नेमकी तीच चूक करीत आहात. म्हणून मला भीती वाटते की, तुम्हांलाही पुढल्या जन्मी पकडून कोष्टी न केले जावे! काही लोक या उपहासात्मक बोलण्याचा नीटसा अर्थ ध्यानी न घेता, याचा अर्थ असा लावतात की, कबीर जातीपातीवर विश्वास ठेवीत असत. अथवा ब्राह्मण कुळात जन्म घेण्याची त्यांच्या मनात सुप्त इच्छा होती. परंतु वस्तुस्थिती अशी नाही. ब्राह्मण म्हणून जन्माला येणे हे तर हीन कर्म केल्याचे लक्षण आहे, असे ते म्हणतात. गीतेतसुद्धा असे म्हटले आहे की, योगामध्ये अथवा तपस्येमध्ये काही अपराध घडून आला असता जीवास धनिकाच्या अथवा ब्राह्मणाच्या घरी जन्म घ्यावा लागतो. पुढे तर त्यांनी केलेला विनोद अधिकच तिखट बनला आहे. ते म्हणतात -- सर्वसामान्य माणसे तर गुराढोरांप्रमाणे अज्ञानी असतात. त्यांची राखण करण्याचे काम त्यांच्या मालकांकडे अर्थात ज्ञानी ब्राह्मणांकडे असते. परंतु, तो स्वार्थी गुराखी असा कसा? रोज एकाच एका जागी जनावरांना चरायला सोडून स्वतः सुखेनैव झोप घेतो, मजा मारतो, आणि कधीही ठराविक कुरणांपलीकडे जाऊन त्यांना चांगले चराऊ कुरण दाखवीत नाही. त्या गुराख्याला काय म्हणावे? जे शिळ्या शास्त्रचर्चा आणि कर्मकांड यांमध्ये लोकांना गुरफटून टाकतात, अशा ब्राह्मणांवर चांगलेच कोरडे ओढले आहेत.

## (चौत्तीस)

**पंडिआ कवन कुमति तुम लागे ।**
**बूड़हुगे परिवार सकल सिउं राम न जपहुं अभागे ।।टेक।।**
**बेद पुरान पढ़े का क्या गुनु खर चंदन जस भारा ।**
**राम नाम की गति नहिं जानी कैसे उतरसि पारा ।।१।।**
**जीअ बधहु सु धरमु करि थापहु अधरम कहहु कत भाई ।**
**आपस कौं मुनिवर करि थापहु काकौ कहौ कसाई ।।२।।**
**मन के अंधे आपि न बुझहु काहि बुझावहु भाई ।**
**माया कारनि बिद्या बेचहु जनमु अबिरथा जाई ।।३।।**

**नारद बचनु बिआस कहते हैं सुक कौं पूछहु जाई ।**
**कहै कबीर रामैं रमि छुटहु नाहिं त बूड़े भाई ॥४॥**

काय रे पंडिता! तू कोणत्या दुर्बुद्धीच्या जाळ्यात सापडला आहेस? सगळ्या तुझ्या कुटुंबासकट बुडून मरशील. हे हतभागी माणसा! जर तू रामाचे स्मरण केले नाहीस तर तुझी अशी गत होईल. तुझ्या वेद-पुराण-पठणाचे कोण कौतुक करील? जसा गाढवावर चंदनाचा भार लादावा तसेच हे आहे! रामनामाचे रहस्यच तुला समजले नाही. तू कसा (भवजलाच्या) पार होणार? (तुझा उद्धार कसा होणार?) जीवनाचा नाश करतोस आणि वर धर्माच्या गप्पा सांगतोस. मग सांग पाहू तूच, खरा अधर्म कोठे आहे ते? परस्परांस ऋषिमुनी मानून बसलास. मग कसाई कोणास म्हणायचे? ज्ञानाने अंध असलेल्या लोकांनो, तुम्ही स्वतः तर काही जाणीत नाही (अथवा तुम्हांस स्वतःचीसुद्धा पुरेशी माहिती नाही). तुम्ही दुसऱ्यांना काय शिकविणार? पैशासाठी विद्या विकीत असता. असेच जीवन वाया चालले आहे! नारदाचे एक वचन आहे. व्यासांनीसुद्धा ते सत्य म्हणून सांगितले आहे. (माझ्यावर विश्वास नसेल तर) शुकदेवाला जाऊन विचार. आणि कबीरसुद्धा तेच म्हणतो – रामाचेच स्मरण करण्याने उद्धार होतो. नाही तर बाबा, आताच्या घडीला तरी तू बुडलेलाच आहेस!

## (पस्तीस)

**कहु पंडित सूचा कवन ठाउं ।**
**जहां बैसि हउं भोजनु खाउं ॥टेक॥**
**माता जूठी पिता भी जूठा जूठे ही फल लागे ।**
**आवाहिं जूठे जाहिं भी जूठे जूठे मरहिं अभागे ॥१॥**
**अगिनि भी जूठी पानी जूठा जूठै बैसि पकाया ।**
**जूठी करछी अन्न परोसा जूठै जूठा खाया ॥२॥**
**गोबरु जूठा चउका जूठा जूठे जीनों कारा ।**
**कहै कबीर तेई जन सूचे जे हरि भजि तजहिं बिकारा ॥३॥**

हे पंडिता! सांग पाहू, कोणती जागा पवित्र आहे जिथे बसून मला भोजन करता येईल? (जगात खरेतर काहीही पवित्र नाही.) माता अपवित्र आहे. पिताही अपवित्र आहे. जी फळे येतात (संतती) तीही अपवित्र आहेत. येणेही अपवित्र. जाणेही अपवित्र. अभाग्याने मरणेसुद्धा अपवित्रच. अग्नीही अपवित्र. पाणीसुद्धा अपवित्र. अपवित्र जागेवर बसूनच (भोजन) शिजविले जाते. अपवित्र डावाने अन्न वाढले जाते. आणि अपवित्र (माणूसच) त्या अपवित्राचे भोजन करतो. शेणही अपवित्र. स्वयंपाकाची जागाही अपवित्र. त्या जागी जी मर्यादा घालून घेतली आहेस (सोवळ्याची) तीही अपवित्र. कबीर म्हणतो, जे ईश्वराचे भजन करून निर्विकार होऊन जातात तेच लोक पवित्र असतात.

## (छत्तीस)

**आऊंगा न जाऊंगा मरूंगा न जिऊंगा ।**
**गुर के साथि अमी रस पिऊंगा ॥टेक॥**
**कोइ फेरै माला कोइ फेरै तसबी ।**
**देखौ रे लोग दोनौं कसबी ॥१॥**
**कोई जावै मक्के कोई जावै कासी ।**
**दोऊ के गलि परि गई पासी॥२॥**
**कहत कबीर सुनौं नर लोई।**
**हम न किसी के न हमरा कोई॥३॥**

— मी येणार नाही, जाणार नाही; आणि मरणार नाही, जगणार नाही. (आवागमन आणि जीवनमरण इत्यादींपासून मुक्त राहीन.) गुरूजवळ राहून भक्तीचा अमृत-रस प्राशन करीन. कोणी जपमाळ ओढीत बसतो. कोणी तसबिरीची पूजा करतो. परंतु लोकहो, हे दोन्ही प्रकार अवडंबरपूर्ण होत. कोणी मक्केला जातो. कोणी काशीस जातो; परंतु दोहोंच्या गळ्यात वासनेचा फास अडकलेला आहे. कबीर म्हणतो, हे मानवजनहो! ऐका, आम्ही कोणाचेही नाही, आमचेही कोणी नाही, हे कटुसत्य आहे.

## (सदतीस)

**कौन मरै जनमैं आई ।**
**सरग नरक कौनैं पाई ॥टेक॥**
**पंच तत अबिगत तैं उतपना एकैं किया निवासा ।**
**बिछरें तत फिर सहजि समाना रेख रही नहिं आसा ॥१॥**
**जब मैं कुंभ कुंभ मैं जल है बाहरि भीतरि पानी ।**
**फूटा कुंभ जल जलही समाना यहु तत कथौ गियानी ॥२॥**
**आदै गगना अंतै गगना मद्धे गगना भाई ।**
**कहै कबीर करम किस लागै झूठी संक उपाई ॥३॥**

कोण मरतो? आणि कोण पुन्हा येऊन जन्म घेतो? आणि स्वर्गनरकाच्या यातना कोण भोगतो? पाचही तत्त्वे अविगत (ब्रह्म) पासून उत्पन्न होतात. तोच या सर्वांत निवास करतो. तत्त्वांचा वियोग झाल्यावर पुन्हा तो आत्मा आपल्या सहज, स्वाभाविक स्थितीत येऊन पोहोचतो. तेथे कोणत्याही प्रकारची रूपरेषा अथवा सीमा नाही. जेथे आशाही नाही. अन् दिशाही नाही. पाण्यामध्ये घट आहे, आणि घटामध्ये पाणी आहे. त्याच्या आत आणि बाहेर दोन्हीकडे पाणीच पाणी आहे. घट फुटून गेल्यावर त्यातील पाणी बाहेरच्या पाण्यामध्ये सामावून जाते. हे ज्ञानी माणसा! हे तत्त्व जरा समजावून

सांग! अरे बंधो! जर आरंभी आकाश, मध्यासही आकाश, अंतीसुद्धा आकाशच आहे, तर मग कर्म कोणासाठी हवे आहे? कबीर असे म्हणतो की, कर्मभोगाविषयीची सारी शंकाकुशंका अकारणच उत्पन्न केली गेली आहे.

पदाचा भाव असा आहे – वास्तविक, सत्य तत्त्व ब्रह्म हेच आहे. त्यापासून सृष्टी निर्माण होते, आणि त्यातच जाऊन पुन्हा विलीन होते. कर्म करणाराही तोच आहे आणि कर्म करविणारासुद्धा तोच आहे. सारा दुनियेचा मायावी व्यापार फक्त पाहण्यापुरताच आहे, असा अर्थ कबीरास अभिप्रेत आहे.

## (अडतीस)

**काहे मेरे बाह्मन हरि न कहहि ।**
**राम न बोलहि पांडे दोजक भरहि ॥टेक॥**
**जिहिं मुख बेद गाइत्री उचरै सो क्यूं बाह्मन बिसरू करै ।**
**जाकै पाइं जगत सम लागै सो पंडित जिउघात करै ॥१॥**
**आपन ऊंच नीच घरि भोजनु घनी करम् करि उदरु भरहि ।**
**ग्रहन अमावस रुचि रुचि मांगहि कर दीपकु लै कूप परहि ॥२॥**
**तू बाह्मन मैं कासी क जुलहस मोहिं तोहिं बराबरी कैसे कै बनहि।**
**कहै कबीर हम राम लगि उबरे बेदु भरोसै पांडे डूबि मरहि ॥३॥**

बा मित्रा, ब्राह्मणा! तू ईश्वराचे नामस्मरण का करीत नाहीस? रामनाम तू घेत नाहीस म्हणूनच तुला नरकात पिचत पडावे लागते. ज्याच्या तोंडातून वेद आणि गायत्री मंत्र यांचा पाठ होतो तो ब्राह्मण चुका का करतो? ज्याच्या चरणांवर सर्व जग नम्र होते तोच पंडित प्राणिहत्या (हिंसा) करीत असतो. स्वतः उच्चभ्रू आहे. परंतु नीचाच्या घरचे भोजन घेतो (नीचाकडून भोजन मिळवितो). हीन कर्मे करून आपले पोट भरतो. ग्रहण आणि अमावास्येच्या वेळी अगदी मनापासून भीक मागतो. अशा प्रकारे हाती दीप असूनही तू खड्ड्यात जाऊन पडतोस. (ज्ञानाची मिजास सांगत पतनाच्या खाईत जाऊन पडतोस.) तू ब्राह्मण (पंडित) आहेस. आणि मी काशीचा कोष्टी आहे. तुझी माझी बरोबरी कशी होईल? कबीर म्हणतो, मी तर त्या रामाचा आश्रय घेऊन उद्धरून गेलो. परंतु हे पंडिता! तू वेदाच्या भरवशावर राहून बुडून मरतो आहेस. (माझ्यात नि तुझ्यात किती मोठा फरक आहे!)

## (एकोणचाळीस)

**हरि बिन भरमि बिगूचे गंदा ।**
**जापहिं जाउं जापु छुटकावन ते बांधे बहु फंदा ॥टेक॥**
**जोगी कहहिं जोगु भल मीठा और न दूजा भाई ।**
**लुंचित मुंडित मोनि जटाधर एहि कहहिं सिधि पाई ॥१॥**

**पंडित गुनी सूर कबि दाता एहि कहहिं बड़ हमहीं ।**
**जहां ते उपजे तहंई समाने हरिपद बिसरा जबहिं ॥२॥**
**तजि बावै दाहिनैं बिकारा हरि पद दिढ़ करि गहिए।**
**कहे कबीर गूंगै गुड़ खाया पूछें तैं क्या कहिए॥३॥**

ईश्वराचे भजन न करता भ्रम आणि गोंधळात सापडून घाणेरडा प्राणी पूर्णपणे विनाश पावला. ज्याच्यापाशी आपला उद्धार करून घेण्यासाठी म्हणून जातो तो स्वतःच अनेक सांसारिक बंधनांत गुरफटलेला दिसतो. योगी म्हणतात, योगच फार चांगला आहे, बाबांनो! दुसरे काही नाही. डोक्यावरचे केस उपटून टाकणारा जैन साधू (लुंचित), मुंडन केलेला साधू, मौनी साधू आणि जटाधारी - हे सर्व लोक म्हणतात, आम्हांला सिद्धी प्राप्त झाली आहे. पंडित, कलाकार, शूरवीर, कवी आणि दाता – हेही लोक म्हणतात की, आम्हीच मोठे आहोत. परंतु, ईश्वराचे स्मरण न केल्यामुळे हे जसे जन्माला येतात तसेच नष्ट होऊन जातात. विकारांना डावीकडे – उजवीकडे सोडून देऊन आपण भक्तिभावच घट्ट पकडून ठेवावयास हवा. (इकडे तिकडे मनास भटकू न देता मार्गक्रमण करावयास हवे.) कबीर म्हणतो, सहजावस्थेत असा काही आनंद आहे की जणू मुक्याने गूळ खावा –त्याला विचारले असता तो काय बरे उत्तर देणार? (गुळाचा स्वाद कसा असतो ते कसे वर्णन करून सांगणार?) तात्पर्य, भक्तिरसाचा आनंद ही केवळ अनुभवण्याचीच वस्तू आहे, त्या आनंदाचे वर्णन करणे अशक्य आहे.

## (चाळीस)

**लोका तुम हौ मति के भोरा ।**
**जउ कासी तनु तजहि कबीरा तौ रामहिं कौन निहेरा ॥१॥**
**जो जन भाउ भगति कछु जानैं ताकौं अचरहु काहो ।**
**जैसें जल जलहीं ढुरि मिलिओ त्यौं ढुरि मिल्यौ जुवाहो ॥२॥**
**कहे कबीर सुनहु रे लोई भरमि न भूलहु कोई ।**
**क्या कासी क्या मगहर ऊखर हिंदै राम जौ होई ॥३॥**

लोकहो! तुम्ही बुद्धीने फार भोळे आहात! मूर्ख आहात. हिंदूंची समजूत आहे त्याप्रमाणे जर कबीराने काशीस देह ठेवला आणि त्याला मुक्ती मिळाली तर मग त्यात रामाचे एवढे कोणते मोठे उपकार झाले? जो सेवक, थोडेबहुत का होईना, भावभक्तीचे मर्म जाणतो, त्याने राममय होण्यात असे काय मोठे आश्चर्य वाटण्यासारखे आहे? जसे पाणी ओघळून पुन्हा पाण्यात जाऊन मिसळते, त्याचप्रमाणे हा कोष्टी (कबीर) सुद्धा ओघळत जाऊन आपल्या कर्त्यास-रामास जाऊन मिळाला. कबीर म्हणतो, लोकहो! ऐका, कोणी भ्रमात राहू नका. जर हृदयी राम आहे तर मग काशी काय नि मगहर ऊसर काय? अर्थात दोन्ही सारखीच आहेत.

*विशेष* : आपल्या जीवनाच्या अंतःकाळी कबीर काही कारणाने काशी सोडून मगहर येथे गेले होते. मगहर येथे मेले असता मुक्ती मिळत नाही, असा अंधविश्वास लोकांमध्ये रूढ होता. यावरूनच "मगहर मरै सो गदहा होई।" (मगहर येथे जो मरतो तो पुढील जन्मी गाढव म्हणून जन्माला येतो, किंवा मगहर येथे मरणारा गाढव होय) अशी म्हण पडली. परंतु कबीरदासांचे म्हणणे असे की, जर काशी येथेच मेले असता मुक्ती मिळते, तर मग रामाच्या भजनाचा बडिवार तो काय? खरेतर, रामाविषयी भक्तिभाव असला पाहिजे – मग कोणी काशीमध्ये मरो किंवा मगहर येथे मरो -- त्याला मोक्ष निश्चित मिळायला हवा. भक्तीवर कबीरांची पूर्ण श्रद्धा होती. या भक्तीचे माहात्म्य सिद्ध करून दाखविण्यासाठीच त्यांनी हीन समजल्या जाणाऱ्या विणकरांच्या कुटुंबात राहून, आणि मगहरसारख्या अपवित्र मानल्या जाणाऱ्या ठिकाणी आपल्या देहाचा त्याग करूनही, भक्तीच्या शक्तीवर कबीर कसा भवसागर तरून जाऊ शकतो ते प्रत्यक्ष दाखवून दिले. आपल्या मुक्तीची त्यांना निश्चित खात्री होती, मग इतरांना ती असो वा नसो. आपली बढाई मारण्यासाठी त्यांनी हे लिहिलेले नाही. अत्यंत समर्थ आत्मविश्वासाने लिहिले आहे.

# दोन
# रमैनी

## (एक)

**पहिले मन मैं सुमिरौ सोई । ता सम तुलै अवर नहिं कोई ।।**
**कोई न पूजै वासौं पाना । आनि अंति वो किनहुं न जाना ।।**
**रूप अरूप न आवै बोला । हरू गरू कछु जाई न तोला ।**
**भूख न त्रिखा धूप नहिं छांही । दुख सुख रहित रहै सब मांही ।।**
**अविगत अपरंपार ब्रह्म, ग्यान रूप सब ठाम ।।**
**बहु बिचार कर देखिया, कोई न सारिख राम ।।**

प्रथम मनामध्ये त्या परमात्म्याचे स्मरण करा. दुसरा कोणीही त्याच्याशी तुलना करण्यासारखा नाही. त्याच्या पलीकडे कोणी जाऊ शकत नाही. त्याचा आदी आणि अंतही कोणी जाणू शकला नाही. तो साकार आहे की निराकार हे शब्दांत (वर्णन करून) सांगता येत नाही. तो हलका आहे अथवा जड आहे हेही काही तोलून दाखविता येत नाही. त्याला भूक लागत नाही, ऊनसावलीही लागत नाही. तो सुखदु:खाच्या पलीकडचा आहे. पण सर्व वस्तुमात्रांत आहे. तो अविगत, आणि अपरंपार आहे. तो ज्ञानस्वरूप आहे आणि सर्व ठिकाणी आहे. फार विचार करून मी पाहिले — रामासारखा दुसरा कोणी नाही.

## (दोन)

**तेहि साहिब के लागौ साथा । दुख सुख मेटिकै रहहु सनाथा ।।**
**ना जसरथ घरि औतारि आवा । ना लंका का राव सतावा ।।**
**देव कोखि न अवतरि आवा । ना जसवै लै गोद खिलावा ।।**
**ना वो ग्वालन कै संगि फिरिया । गोबरधन लै ना कर धरिया ।।**
**बावन होइ नहीं बलि छलिया । धरनी बेल लै न ऊधरिया।।**
**गंडक सालिगराम न कोला । मच्छ कच्छ होइ जलही न डोला ।।**
**बद्री बैसि ध्यान नहिं लावा । परसराम हैं खत्री न सतावा ।।**
**द्वारावती सरीर न छांड़ा है। जगन्नाथ लै पिंड न गाड़ा ।।**

**कहै कबीर बिंचारि करि, ए ऊले ब्यौहार ।**
**याहीतैं जो अगम है, सो बरति रहा संसार ॥**

त्या स्वामीबरोबर चला आणि आपले सुखदुःख दूर करून सनाथ होऊन जा. तो ईश्वर दशरथाच्या घरी अवतार म्हणून प्रकट झालेला नाही, किंवा त्याने लंकेच्या राजासही परास्त केले नाही. तो देवकीच्या कुशीतही अवतरला नाही. यशोदेने त्याला आपल्या मांडीवर खेळविलेले नाही. तो गवळ्यांच्या मुलांबाळांबरोबर वनात फिरलाही नाही, किंवा त्याने त्यांच्यासाठी गोवर्धन पर्वतालाही हातावर उचलला नाही. वामन बनून त्याने बळिराजालाही फसविले नाही. (वराहावतारात) पृथ्वी आणि वेद घेऊन त्यांचा उद्धारही त्याने केला नाही. गंडक नदीत शाळिग्राम बनून तो हालचाल करीत बसला नाही. (मत्स्यावतार आणि कच्छावतार यांमध्ये) मासा आणि कासव बनून तो पाण्यात क्रीडा करीतही राहिला नाही. (नरनारायण अवतारात विष्णूने बद्रीनाथ येथे तपस्या केली असे समजतात त्याप्रमाणे) त्याने बद्रीनाथच्या तीर्थक्षेत्री बसून ध्यानधारणा केलेली नाही. आणि परशुराम होऊन त्याने क्षत्रियांना त्रस्तही केले नाही. द्वारावतीसही त्याने शरीरत्याग केला नाही अथवा जगन्नाथपुरीमध्ये त्याचा पिंड गाडलेला नाही. कबीर विचारपूर्वक सांगतो की, हे सर्व वरवरचे व्यवहार (खोट्या समजुती) आहेत. जो या सर्वांपेक्षा अगम्य आहे तोच या जगास व्यापून आहे.

## (तीन)

**जिनि कलमा कलि मांहिं पढ़ावा । कुदरति खोजि तिनहुं नहिं पावा ॥**
**करम करीम भए करतूता । बेद कुरान भए दोउ रीता ॥**
**किरतिम सो जु गरम अवतरिया । किरतिम सो जो नामहिं धरिया ॥**
**किरतिम सुन्नति और जनेऊ । हिंदू तुरुक न जानैं भेऊ ॥**
**मन मुसले की जुगति न जानैं । मति मुलानि दुइ दीन बखानैं ॥**
**पानी पवन संजोइ करि, कीया है उतपाति ।**
**सुन्नि मैं सबद समाइगा, तब कासनि कहिऐ जाति ॥**

ज्यांनी कलियुगात कलमा अर्थात इस्लामचा मूलमंत्र म्हटला ते मुहंमदही ईश्वराच्या शक्तीचे मर्म जाणू शकले नाहीत. ईश्वराच्या कृपेमुळेच सर्व कार्यकलाप प्रत्यक्षात येऊ शकले आहेत (सृष्टीची रचना झाली आहे.) वेद आणि कुराण वास्तविक हे दोन्ही रिकामेच आहेत. दयाशील ईश्वराची कृतीच प्रमुख बाब आहे. (वेद आणि कुराणाचाच हवाला सांगून अनेक बाह्यावडंबराची कल्पना करण्यात आली. पुढे त्यांचे वर्णन आलेच आहे). ज्याने गर्भामध्ये अवतार घेतला तो बनावट आहे. ज्याचे नाव धारण केले गेले तो कृत्रिम आहे. सुंता आणि मुंज हे दोन्ही आचार कृत्रिम आहेत. हिंदू अन्

मुसलमान दोघेही हे रहस्य जाणत नाहीत. मनाच्या (एकाग्रतेचा) प्रश्न सोडविण्याची युक्ती त्यांना माहीत नाही. त्यांची बुद्धी भ्रष्ट झालेली आहे. त्याच भ्रष्ट बुद्धीने ते दोघे धर्माची कल्पना करीत असतात. पाणी आणि वायू यांचा मेळ जमून जीवाची रचना होते. शेवटी जेव्हा शून्यामध्ये शब्द सामावून जाईल तेव्हा कोणास जातपात विचारली जाईल? (अर्थात सिद्धावस्था प्राप्त होईल तेव्हा सारा जातीजमातीचा परस्पर भेदभावाचा विचार नष्ट होऊन जाईल.)

कलमा - मुसलमानांच्या धर्माचा मूलमंत्र सांगणारे वाक्य 'ला इलाह इल्लिल्लाह, मुहम्मद रॅसूल्लिल्लाह.'

## (चार)

**पंडित भूले पढ़ि गुनि बेदा । आपु अपनपौ जान न भेदा ॥**
**संझा तरपन अरु खट करमां । लागि रहे इनके आसरमां ॥**
**गइत्री जुग चारि पढ़ाई । पूछहु जाइ मुकुति किन पाई ॥**
**और के छुएं लेत है सींचा । इनतें कहहु कवन है नीचा ॥**
**अति गुन गरब करैं अधिकाइ ।अधिकै गरबि न होइ भलाई ॥**
**जासु नाम है गरब प्रहारी । सौ कस गरबहिं सकै सहारी ॥**
**कुल अभिमान बिचार तजि, खोजौ पद निरबान ।**
**अंकुर बीज नसाइगा, तब मिलै बिदेही थान ॥**

ब्राह्मण (पंडित) वेदवचनांचे पठण करूनही वाट चुकले – आपलेच खरे स्वरूप ते जाणत नाहीत. संध्या, तर्पण आणि षट्कर्म -- हे यांच्या आश्रमांत सुरू आहे. चारही युगात गायत्री मंत्र शिकत- म्हणत राहिले. त्यांना जाऊन जरा विचारा, यामुळे मुक्ती कोणाला लाभली आहे ते! आणि ते जरासा कोणाचा स्पर्श झाला की स्नान करतात. परंतु तुम्हीच सांगा, ह्यांच्याहून अधिक नीच कोण असेल? आपल्या अत्यंत गुणसंपन्न असण्याचा यांना गर्व आहे. परंतु फार गर्वाने कोणाचे भले होत नाही. कारण, ज्याचे नाव "गर्वप्रहारी' आहे तो परमात्मा गर्व कसा सहन करू शकेल? म्हणून कुळाचा वृथा अभिमान सोडून मोक्ष मिळविण्याचा विचार करा. जेव्हा अंकुरासहित बीज नष्ट होईल (वासना नष्ट होतील) तेव्हाच विदेहावस्था (मोक्ष) प्राप्त होईल. चांगली वा वाईट जशी कर्मे असतील – त्यांविषयी जर ओढा असेल तर मग पुन्हा जन्म धारण करून त्यांचे फळ भोगावयास हवे. म्हणून कर्मास बीज पेरण्याची उपमा दिली जाते. बीज जर जाळून पेरले तर त्यातून अंकुर निघणार नाही, त्याचप्रमाणे कर्मे जर निरासक्त भावाने केली जातील तर जन्म-मरणापासून सुटका होऊन मोक्ष मिळेल. अंकुरासह बीज नासविण्याचा हा अर्थ आहे.

## (पाच)

**अब गहि राम नाम अबिनासी । हरि तजि जनि कतहूं कै जासी ॥**
**जहां जाहि तहां होहि पतंगा । अब जिनि जरसि समुझि बिख संगा ॥**
**चोखा राम नाम मनि लीन्हां ।भ्रिंगी कीट भिन्न नहिं कीन्हां ॥**
**भौसागर अति वार न पारा ॥ तिहिं तिरिबे का करहु बिचारा ॥**
**मनि भावै अति लहरि बिकारा । नहिं गमि सूझै वार न पारा ॥**
**भौसागर अथाह जल, तामैं बोहिथ राम अधार ।**
**कहै कबीर हरि सरन गहु, तब गोबछ खुर बिस्तार ॥**

आता त्या अविनाशी रामाला शरण जा. ईश्वरास सोडून अन्यत्र कोठेही जाऊ नका. जेथे जाना तेथेच पतंग बनून (वेडे होता) आणि शेवटी जळून नष्ट होऊन जाता. आता जरा समजावून घ्या. विषय-वासनांमध्ये (अथवा जगरूपी विषाबरोबरच) जळून जाऊ नका. उत्तम प्रकारे रामनामाचे स्मरण मनामध्ये करीत राहिले असता, भृंग आणि कीटकाप्रमाणे तू त्याच्यासारखाच होऊन जाशील. भवसागर विशाल आहे. अथांग आहे. त्याला आरपार नाही. त्यात तरून जाण्याची युक्ती शोधून काढा. मनाला विकाराच्या लाटाच फार आवडतात. त्यांच्या पलीकडे जाण्याचा उपाय सुचत नाही. या भवसागरात अथांग जल (पसरलेले) आहे. त्यात रामरूपी नावेचाच आधार आहे. कबीर म्हणतो, ईश्वराला शरण जा. त्यावेळी हा अनंत सागर वासराच्या खुराएवढा लहान भासू लागेल!!

## तीन

# साखी

राम नाम के पटंतरै, देबे कौं कछु नाहिं ।
क्या ले गुर संतोखिए, हौंस रही मन मांहिं ॥१॥
सतगुर की महिमा अनंत, अनंत किया उपगार ।
लोचन अनंत उधारिया, अनंत दिखावनहार ॥२॥
चकई बुछुरी रैंनि की, आइ मिलै परभाति ।
जे नर बिछुरे राम सौं, ते दिन मिले न राति ॥३॥
बिरहा बिरहा मति कहौ, बिरहा है सुलतान ।
इहि घट बिरह न संचरै, सो घट सदा मसान ॥४॥
अंखियन तौ झांई परी, पंथ निहारि निहारि ।
जिभ्या मैं छाला परा, राम पुकारि पुकारि ॥५॥
नैनां नीझर लाइया, रहट बहै निस घाम ।
पपिहा ज्यौं पिउ पिउ करौं, कब रे मिलहुगे राम ॥६।
सोई आंसू साजना, सीई लोग बिड़ाहिं ।
जो लोइन लोही चुवै, तौ जानौं हेतु हियांहिं ॥७॥
कबीर सूता क्या करै, उठि किन रोवै दुक्ख ।
जाका बासा गोर मैं, सो क्यूं सोवै सुक्ख ॥८॥
तूं तूं करता तूं भया, मुझमैं रही न हूं ।
वारी तेरे नाउं परि, तिज देखौं तित तूं ॥९॥
जान भगत ला नित मरन, अनजाने का राज ।
सर अपसर समझै नहीं, पेट भरन सौं काज ॥१०॥
भगत हजारी कापड़ा, तामैं मल न समाइ ।
साकत काली कामरी, भावै तहां बिछाइ ॥११॥
ऐसा कोई ना मिलै, जासीं रहिए लागि ।
सब जग जरता देखिया, अपनी अपनी आगि ॥१२॥
सारा सूरा बहु मिलैं, घाइल मिलै न कोइ ।
घाइल कौं घाइल मिलै, तो राम भगति दिढ़ होइ ॥१३॥

हम घर जाला आपना, लिए मुराड़ा हाथि ।
अब घर जालौं तास का, जो चलै हमारे साथि ॥१४॥
मेरा मुझमैं किछु नहीं, जो किछु है सो तेरा ।
तेरा तुझकौं सौंपतां, क्या लागै मेरा ॥१५॥
कस्तूरी कुंडलि बसै, म्रिग ढूंढै बन मांहिं ।
ऐसे घटि घटि राम है, दुनिया देखै नाहिं ॥१६॥
हेरत हेरत हे सखी, रहा कबीर हिराइ ॥
बूंद समानी समुंद मैं, सो कत हेरी जाइ ॥१७॥
तन भीतर मन मानिया, बाहरि कतहुं न जाइ ।
ज्वाला तैं फिरि जल भया, बुझर बलंती लाइ ॥१८॥
कबीर सबद सरीर मैं, बिन गुल बाजै तांति ।
बाहरि भीतरि रमि रहा, तातैं, छूटि भरांति ॥१९॥
गंग जमुन के अंतरै, सहज सुन्नि लौं घाट ।
तहां कबीरा मठ रचा मुनिजन जोवैं बाट ॥२०॥
नैनां अंतरि आव तूं, ज्यौं हौं नैन झंपेउं ।
ना हौं देखौं और कौं, ना तुझ देखन देउं ॥२१॥
दोजग तो हम अंगिया, यहु डर नाहीं मुज्झ ।
भिस्ति न मेरै चाहिए, बाझ पियारे तुज्झ ॥२२॥
हरि रस पीया जानिए, ज उतरै नाहिं खुमारि ।
मैमंता घूमत फिरैं, नाहीं तन की सारि ॥२३॥
प्रेम न बारी ऊपजै, प्रेम न हाटि बिकाइ ।
राजा परजा जिहिं रुचै, सीस देइ लैं जाइ ॥२४॥
कबीर नौबति आपनी, दिन दस लेहु बजाइ ।
यहु पुर पट्टन यहु गली, बहुरि न देखहु आइ ॥२५॥
कबीर धूरि सकेलि के, पुड़िया बंधी एह ।
दिवस चारि का पेखना, अंति खेह की खेह ॥२६॥
मानुख जनम दुलंभ है, होइ न बारंबार ।
पाका फल जो गिरि परा, बहुरि न लागै डार ॥२७॥
कबीर गरब न कीजिऐ, काल गहे कर केस ।
ना जानौं कहं मारिहै, कै घर कै परदेस ॥२८॥
कबीर मंदिर लाख का, जड़िया हीरै लालि ।
दिवस चारि का पेखना, बिनसि जाइगा काल्हि ॥२९॥
ऊजड़ खेड़े टीकरी, गढ़ि गढ़ि गए कुम्हार ।
रावन सरिखा चलि गया, लंका का सिकदार ॥३०॥

आजि कि काल्हि कि पचे दिन, जंगलि होइगा बास ।
ऊपरि ऊपरि फिरहिंगे, ढोर चरंते घास ॥३१॥
ज्यौं कोरी रेजा बुनैं, नेरा आवै छोरि ।
ऐसा लेखा मीच का, दौरि सकै तौ दौरि ॥३२॥
कबीर हद के जीव सौं, हित करि मुखां न बोलि ।
जे राचे बेहद्द सौं, तिनसौं अंतर खोलि ॥३३॥
कहा चुनावै मौड़िया, चूना माटी लाइ ।
मीच सुनैंगी पापिनी, ऊदारेगी आइ ॥३४॥
कबीर जंत्र न बाजई, टूटि गए सब तार ।
जंत्र बिचारा क्या करै, चले बजावनहार ॥३५॥
चाकी चलती देखिकै, दिया कबीरा रोइ ।
दोइ पट भीतर आइकै, सालिम गया न कोइ ॥३६॥
हे मतिहीनी माछरी, झीवर मेला जाल ।
डाबरियां छूटै नहीं, सकै त समुंद सम्हालि ॥३७॥
कहा चुनावै मैड़ियां, लंबी भीति उसारि ।
घर तौ साढ़े तीलि हथ, घना त पौंनैं चारि ॥३८॥
बारी बारी आपनी, चले पियारे मीत ।
तेरी बारी जीयरा, नेरी आवै नीत ॥३९॥
पानी केरा बुदबुदा, अस मानुस की जाति ।
देखत ही छिपि जाइंगे, ज्यौं तारे परभाति ॥४०॥
रोवनहारे भी मुए, मुए जलावनहार ।
हा हा करते ते मुए, कासौं करौं पुकार ॥४१॥
पंथी ऊभा पंथ सिरि, बगुचा बांधा पूटि ।
मरना मुंह आगैं खड़ा, जीवन का सब झूटि ॥४२॥
जिनि हम जाए ते मुए, हम भी चालनहार ।
हमरै पाछैं पूंगरा, तिन भी बांधा भार ॥४३॥
कबीर यहु जग कछु नहीं, खिन खारा खिन मीट ।
काल्हि अलहजा मैड़ियां, आजु मसांनां दीट ॥४४॥
बेटा जाए क्या हुआ, कहा बजावै थाल ।
आवन जावन ह्वै रहा, ज्यौं कीड़ी का नाल ॥४५॥
राम पदारथु पाइ करि, कबिरा गांठि न खोलि ।
नहिं पट्टन नहिं पारिखू, नहिं गाहक नहिं मोलि ॥४६॥
हीरा तहां न खोलिए, जहं कुंजड़न की हाटि ।
सहजै गांठी बांधिकै, लगिए अपनी बाटि ॥४७॥

मरता मरता जग मुवा, मुवै न जाना कोइ ।
दास कबीरा यौं, मुवा, ज्यौं बहुरि न मरना होइ ॥४८॥
कबीर मन निरमल भया, जैसा गंगा नीर ।
तब पाछैं लागा हरि फिरै, कहत कबीर कबीर ॥४९॥
जीवन तैं मरिबौ भलौ, जौ मरि जानैं कोइ ।
मरनैं पहिले जो मरै, तौ कलि अजरावर होइ ॥५०॥
कबीर हरदी पीयरी, चूना ऊजल भाइ ।
राम सनैही यूं मिलै, दोनउं बरन गंवाइ ॥५१॥
हद्द चलै सो मानवा, बेहद चलै सौ साध ।
हद बेहद दोऊ तजै, ताकर मता अगाध ॥५२॥
हिंदू मूआ राम कहि, मूसलमान खुदाइ ।
कहै कबीर सो जीवता, जो दुहुं के निकटि न जाइ ॥५३॥
काबा फिरि कासी भया, रामहिं भया रहीम ।
मोट चून मैदा भया, बैठि कबीरा जीम ॥५४॥
सेख सबूरी बाहिरा, क्या हज काबै जाइ ।
जाकी दिल साबित नहीं, ताकौं, कहां खुदाइ ॥५५॥
कासी काटैं घर करै, पीवै निरमल नीर ।
मुकुति नहीं हरि नाउं बिनु, यौं कहै दास कबीर ॥५६॥
सांई शेती सांच चलि, औरां सौ सुध भाइ ।
भावै लांबे केस करि, भावै घुरड़ि मुडाइ ॥५७॥
साधु भया तौ क्या भया, माला मेली चारि ।
बाहरि ढोला हींगला, भीतर भरी भंगारि ॥५८॥
कैसौं कहा बिगारिया, जे मूड़ै सौ बार ।
मन कौं काहे न मूड़िए, जामैं विखै बिकार ॥५९॥
सोई आखर सोइ बैंन, जन जू जू बाचवंत ।
कोई एक मेले लवनि, अमी रसाइन हंत ॥६०॥
गनी हू तैं, पातरा धूंवां हू तैं झीन ।
पवना बेगि उतावला, सो दोस्त कबीरै कीन ॥६१॥
कबीर भली मधूकरी, भांति भांति कौं, नाज ।
दावा किसही का नहीं, बिन बिल्लाइत बड़ राज ॥६२॥
चिंता छांड़ि अचिंत रहु, सांई है समरत्थ ।
पसु पंखेरू जीव जंतु तिनकी गांठी किसा गरत्थ ॥६३॥
राम नाम सौं दिल मिली, जम हम परी बिराइ ।
मोहिं भरोसा इस्ट का, बंदा नरकि न जाय ॥६४॥

**गावन ही मैं रोज है, रोवन ही मैं राग ।**
**इक बैरागी ग्रिह करै, एक ग्रिही बैराग ॥६५॥**
**कबीर पढ़िबा दूरि करि, पुसतग देहु बहाइ ।**
**बावन अक्खिर सोधिकै, ररै ममैं चित्त लाइ ॥६६॥**
**सहजैं सहजैं सब गये, सुत बित कामिनि काम ।**
**एकमेक होइ मिलि रहा, दास कबीरा राम ॥६७॥**

## दोह्यांचा अर्थ

१) जे गुरूने मला दिले आहे, त्या रामनामाबरोबर ज्याची तुलना होऊ शकेल, असे दुसरे काही देण्यासारखे माझ्यापाशी नाही. काही देऊन गुरूला संतुष्ट करावे ही माझी इच्छा मनामध्येच राहिली – अपुरी राहिली.

२) सद्‌गुरूंचे माहात्म्य अनंत आहे, आणि त्यांनी माझ्यावर थोर उपकार केलेले आहेत. त्यांनी मला व्यापक दृष्टी दिली. त्यामुळेच मी अनंत अशा ईश्वराचे दर्शन घेऊ शकतो.

३) रात्री विरह झालेली चक्रवाकी सकाळी पुन्हा चक्रवाकाला भेटू शकते. परंतु जे लोक रामापासून दूर असतात ते दिवसाही त्याला भेटू शकत नाहीत. त्यांचे दुःख कधी दूर होत नाही.

४) 'विरह', 'विरह' असे त्राग्याने म्हणू नका. 'विरह' तर राजाधिराज आहे! ज्याच्या देही-हृदयी विरह-दुःखच निर्माण होत नाही, तो सदैव स्मशानाप्रमाणे असतो.

५) (प्रियतम ईश्वराची) वाट पाहता पाहता डोळ्यांसमोर अंधारी येऊ लागली (दिसेनासे झाले) आणि रामनामाचा उद्‌घोष करता करता जिभेस व्रण पडले आहेत. (तर तो ईश्वर कसा भेटत नाही?)

६) डोळ्यांतून अश्रूंचा झरा वाहतोच आहे. रात्रंदिवस रहाटासारखा चालूच आहे. चातकाप्रमाणे (पी कहाँ? पी कहाँ? म्हणणारा पपीहा प्रियकराच्या नावाचा जप करतो आहे. हे प्रभो! तू कधी भेटणार आहेस?

७) सज्जनांचे अश्रू तेच, दुर्जनांचेही तेच. जेव्हा नेत्रांतून रक्ताचे अश्रू येतील (खरेखुरे अश्रू असतील) तेव्हाच हृदयी खरे प्रेम आहे असे समजावे.

८) कबीर म्हणतो, झोपून राहून काय करणार? उठून तू तुझे दुःख रडून मोकळे का करीत नाहीस? ज्याचा निवासच कबीरामध्ये व्हावयाचा आहे (जीवन क्षणभंगुर आहे) त्याने सुखाने का झोपून राहावे?

९) तू तू करता करता आता केवळ तूच होऊन गेला आहे (ईश्वराचे स्मरण करता करता मी ईश्वरमय झालो) – माझ्यात आता माझे असे 'मी'पण राहिलेले नाही. मी स्वतःस तुझ्या नामरूपावर समर्पित करून टाकले आहे. आता तर, मी जेथे पाहतो तेथे तूच तू दिसून येतोस.

१०) ज्ञानी भक्त सदैव अडचणीत सापडला आहे. अज्ञ जनांचे राज्य आहे (त्यांची चलती आहे). कारण ते मागचा-पुढचा विचार करू शकत नाहीत (विवेक नाही). त्यांना फक्त आपले पोट भरण्याशी कर्तव्य असते.

११) वैष्णव भक्त हजारिया या मौल्यवान वस्त्राप्रमाणे आहे, त्यात मळ साठत नाही (कारण ते वस्त्र जपून ठेवले जाते, घाणीत अंथरले जात नाही). याच्या मानाने शाक्त हा काळ्या कांबळ्याप्रमाणे आहे. पाहिजे तेथे अंथरा! (अगदी तलम सुताने विणलेल्या कापडास हजारिया असे म्हणत असत.)

१२) ज्याचा आधार घ्यावा असा कोणीही मला सापडत नाही. सारे जगच मी आपापल्या आगीमध्ये जळताना पाहिले. अर्थात प्रत्येक जण आपल्याच विवंचनेने ग्रासला असल्याचे मला दिसून आले.

१३) निशाणबाज आणि शूरवीर तर खूप दिसले. पण त्रस्त झालेला कोणी दिसला नाही. त्रस्त झालेल्याला जर तसाच दुसरा त्रस्त झालेला भेटला तर राम-भक्ती दृढ होईल. म्हणजे असे की, बढाया मारणारे उपदेशकच खूप भेटतात, परंतु खराखुरा विरही साधक मोठ्या सायासाने भेटतो.

१४) मशाल हातात घेऊन मी माझे घर जाळून टाकले. माझ्याबरोबर जो कोणी आता येईल त्याचेही घर आता जाळून टाकणार आहे! तात्पर्य, धनदौलत राखून ठेवण्याची वृत्ती आदर्श भक्ताने सोडून दिली पाहिजे.

१५) माझ्यामध्ये माझे असे काहीच नाही. जे काही आहे ते सर्व तुझेच आहे. तुझेच तुला देऊन टाकण्यात माझे पदरचे काय जाते आहे?

१६) कस्तुरीमृगाच्या नाभीतच कस्तुरी असते. पण तो मृग संपूर्ण वनात तिचा शोध करीत फिरतो. असाच प्रत्येक माणसामध्ये तो राम सामावलेला आहे, पण जग कस्तुरीमृगाप्रमाणे अज्ञानवश असून त्यास पाहू शकत नाही.

१७) हे सखी, शोधता शोधता कबीर स्वतःस हरवून बसला. थेंब (जीवात्मा) सागरामध्ये (परमात्म्यामध्ये) सामावून गेला आहे – त्याला शोधून काढणे कसे शक्य आहे?

१८) शरीरातच मन रमून गेले. आता ते बाहेर कोठे जात नाही. जळणारी आग विझून गेली आणि ज्वाला शीतल जलामध्ये परिवर्तित झाली.

१९) कबीर म्हणतो, शरीरामध्ये दोराशिवाय आवाज (अनाहत नाद) होत राहिला आहे. आत आणि बाहेरही सर्वत्र तोच 'शब्द' पसरला आहे. यामुळे सर्व 'दुविधा' (भ्रम) नष्ट झाली आहे.

२०) गंगा आणि यमुना (इडा आणि पिंगला नाडी) यांच्यामध्ये (सुषुम्ना नाडी) सहज शून्याचा घाट आहे. तेथे कबीराने आपला मठ बांधला आहे. त्यात प्रवेश मिळविण्यासाठी सर्व मुनिजन केव्हाचे वाट पाहत बसले आहेत. (अर्थात, हे सुख त्यांनाही दुर्मिळ आहे.)

२१) तू माझ्या डोळ्यांत येऊन सामावून जा. मग मी नेत्र बंद करून घेईन. त्यामुळे मीही अन्य कोणास पाहणार नाही, आणि तुलाही दुसऱ्या कोणास पाहू देणार नाही.

२२) नरक तर आम्ही मान्य करून टाकला. त्याची मला मुळीच भीती वाटत नाही. कारण हे प्रियकर! तुझ्याविना मला स्वर्गसुद्धा नको आहे!

२३) हरि-रस (भक्तीची मदिरा) प्राशन केला आहे असे तेव्हा समजावे जेव्हा त्याची धुंदी कधी उतरत नाही. पिणारा भक्त बनून हिंडत राहावा आणि त्याला शरीराचीदेखील शुद्ध राहू नये (तो त्या अलौलिक आनंदात अगदी मग्न असावा.)

२४) प्रेम बगीचामध्ये उत्पन्न होत नाही, आणि ते बाजारात विकलेही जात नाही. राजा अथवा प्रजा ज्या कोणास ते हवे असेल त्याने आपले शिर द्यावे आणि प्रेम घेऊन जावे-बलिदानास तयार असावे.

२५) कबीर म्हणतो, दहा दिवस आपली नौबत वाजवून घ्या (स्वतः उपभोग घेत राहा). (पण हे पक्के ध्यानी असू द्या की) हे शहर आणि ही गल्ली पुन्हा येऊन पाहता येणार नाही. (काळ फार बलवान आहे.)

२६) कबीर म्हणतो, धूळ एकत्र करून ही शरीररूपी पुडी तयार केली गेली आहे. चार दिवसांचा सर्व खेळ आहे. शेवटी माती मातीसच मिळणार आहे. शरीर नष्ट होऊन जाणार आहे.

२७) मनुष्याचा जन्म मोठा दुर्लभ आहे. तो पुनःपुन्हा प्राप्त होत नाही. पिकलेले फळ एकदा खाली पडले की पुन्हा फांदीला चिकटत नाही.

२८) कबीर म्हणतो, गर्व करता कामा नये. कारण, तो काळ तुमचे केस पकडून ठेवणारा आहे. तो तुम्हांस घरी अथवा परदेशी कोठे नेऊन मारील त्याचा नेम नाही.

२९) कबीर म्हणतो, हिरे आणि मौल्यवान रत्नांनी जडविलेले लाखेचे घर म्हणजे चार दिवसांचा खेळ होय. ते उद्याच, अर्थात थोड्याच वेळात, नष्ट होऊन जाईल. (कारण, थोड्याशा उष्णतेनेही ती लाख वितळून जाईल.) याचप्रमाणे नाना प्रकारच्या साजशृंगाराने सजविले जाणारे मनुष्याचे शरीर अल्पावधीतच नष्ट होऊन जाणारे असते.

३०) ओस पडलेल्या गावात केवळ ठिकऱ्याच शिल्लक राहिल्या आहेत. ज्या मातीच्या भांड्यांच्या या ठिकऱ्या आहेत, त्यांना घडविणारे कुंभार तर केव्हाच निघून गेले; तेच नव्हे तर रावणासारखा माणूसही नष्ट झाला, तो तर लंकेचा अधिपती होता!

३१) आज, उद्या किंवा (फार फार तर) चार-पाच दिवसांनी जंगलामध्ये मुक्काम असेल (जंगलामध्ये गाडण्यात येईल) आणि त्यावर गवत खात फिरणारे पशू हिंडत फिरत असतील!

३२) ज्याप्रमाणे विणकर विणत असताना कपड्याचे दुसरे टोक जवळ येत जाते, त्याचप्रमाणे मरणाचा हिशेब असतो. - जर तू यापासून तुझा बचाव करून घेण्यासाठी धावू शकत असशील तर धाव. (यापासून सुटका करून घेणे कसे शक्य आहे?)

कपडा विणत असताना ताग्याचे जितके सूत भरत जाते तितका तितका त्याचा टोकाचा भाग जवळ येत राहतो. त्याचप्रमाणे जितका श्वासोच्छ्वास आपण करीत राहतो तितके जीवनाचे क्षण संपत जातात आणि अंतःकाळ जवळ येत असतो. म्हणून कबीरदास असा सावधपणाचा इशारा देतात की, मनुष्यप्राण्याने असे काही केले पाहिजे की ज्यायोगे त्याचे मृत्यूचे भय दूर होईल आणि अमरत्वाविषयी आकर्षण वाढेल.

३३) कबीर म्हणतो, संकुचित विचाराच्या लोकांशी थोडीदेखील प्रेमाची भाषा बोलू नका; पण जे व्यापक विचाराचे आहेत त्यांच्यापाशीच आपले हृदय मोकळे करीत जा.

३४) चुना आणि माती लावून महाल काय सजवितो आहेस? तो पापी वृत्तीचा मृत्यू जर ऐकेल तर येऊन सर्व कोसळून पाडील. (अर्थ असा की) या नाशवंत जगात मोठमोठे महालसुद्धा कोसळून पडतात. म्हणून ते बांधण्यात फार मोठा पुरुषार्थ नाही. मनुष्यास जर अमर व्हावयाचे असेल तर याहूनही खूप मोठी कामे करावयास हवीत.

३५) कबीर म्हणतो, आता वाद्य वाजत नाही. कारण याच्या सर्व तारा तुटल्या आहेत (शरीर निष्प्राण होऊन गतिहीन झाले आहे). जर वाजविणाराच निघून गेला तर वाद्य तरी बिचारे काय करणार? (जो प्राण त्याला हिंडवीत-फिरवीत असे तोच निघून गेल्यावार बिचारे शरीर तरी काय करणार?)

३६) गिरणी चालू असलेली पाहून कबीरास रडू कोसळले. या दोन जात्यांमध्ये सापडून कोणीच शिल्लक उरला नाही, या विचाराने तो कष्टी झाला. तात्पर्य असे – ज्याप्रमाणे गिरणीच्या दोन जात्यांमध्ये सापडून धान्य दळले जाते, त्याचप्रमाणे पृथ्वी आणि आकाश यांच्यामध्ये सापडून सारे जण भरडले जातात, नष्ट होतात.

३७) हे निर्बुद्ध मत्स्या (जीवा), कोळ्याने (काळाने किंवा यमाने) जाळे टाकले आहे. तळ्यामध्ये (मूर्तिपूजा आदी लहानसहान उपायांनी) तर तुझे प्राण वाचणार नाहीत. जर शक्य झाले तर समुद्रात जाऊन स्वतःस सांभाळ, अर्थात, परमतत्त्वास शरण जाऊन आपले रक्षण कर.

३८) लांबलचक भिंत उभी करून महाल काय रंगवितो आहेस? तुझे घर तर साडेतीन हातांचे असायला हवे (साडेतीन हात उंचीचे मनुष्य शरीर असते म्हणून). अगदी अधिकच तर पावणेचार हात!

३९) आपापल्या वेळी सर्व प्रिय जन निघून गेले (मृत्यू पावले). हे प्राणा, आता तुझी पाळीही दिवसेंदिवस जवळ येत चालली आहे. तात्पर्य, मृत्यूच्या छायेत सर्वांनाच वावरायचे असते हे जाणून चांगल्या कार्यात मग्न व्हायला हवे.

४०) पाण्यावरचा बुडबुडा जसा क्षणिक असतो तसेच मानव जातीचे जीवन क्षणभंगुर आहे. पहाटेचे तारे पाहता पाहता जसे डोळ्यांसमोरून नष्ट होतात तसेच माणसाचे जीवन क्षणिक आहे.

४१) (कोणाच्या मृत्यूनंतर) रडणारेही मरून गेले. ज्यांनी दुसऱ्यांची प्रेते जाळली तेही मेले, जे उगा-उगा म्हणून सांत्वन करीत होते तेही मेले. आता कोणास हाक द्यावी? (असे शिल्लक तरी कोण राहिले आहे?)

४२) पाठीवर ओझे बांधून पथिक पथावर उभा आहे (आपल्या कर्माचे ओझे पाठीवर लादून प्रवासी मानव मृत्यूच्या वाटेवर उभा राहिला आहे). मरण साक्षात तोंडासमोर उभे दिसते आहे. – जीवनाविषयीची सारी चर्चा व्यर्थ आहे.

४३) ज्यांनी आम्हांला निर्माण केले, ते मरून गेले, आम्हीदेखील आता जाण्याच्या तयारीत आहोत. आमच्या पाठीमागून जी आमची मुलेबाळे आहेत, त्यांनीही बाडबिस्तारा बांधला आहे (तीही जाण्याच्याच तयारीत आहेत).

४४) कबीर म्हणतो, हे जग म्हणजे काही नाही. (या जगात काही अर्थ नाही. त्याचे निश्चित असे स्वरूप नाही.) क्षणात खारट वाटते, क्षणात गोड लागते. काल प्रासादामध्ये जो महामान्य होता तो आज स्मशानात दिसला!

४५) पुत्र झाल्याने काय (कौतुक) झाले? काय असा आनंदाने वाद्ये वाजवितो आहेस? अरे, हे येणे-जाणे तर मुंग्यांच्या रांगेसारखे चालूच आहे.

४६) रामरूपी मौल्यवान माणिक प्राप्त करून, हे कबीर! तू गाठ सोडू नकोस (ते स्वत:पाशीच जतन करून ठेव). कारण, हे असे शहर नाही की जेथील लोक ते खरेदी करतील. ते याचे खरे पारखीही नाहीत, खरे-खुरे ग्राहकही नव्हेत किंवा योग्य ते मूल्य त्यांच्यापाशी आहे असेही नाही.

४७) हिरा जर जवळ असेल तर तो भाजीवाल्यांच्या बाजारात बाहेर काढू नये. सरळ जवळ झाकून ठेवून आपल्या रस्त्याने चालत राहावे. म्हणजे, योग्य व्यक्ती भेटली असताच ज्ञान-चर्चा करायला हवी.

४८) मरता मरता सारे जग मरून गेले. तरीही खरेखुरे मरण कोणीच जाणू शकले नाही. कबीरदास असे मेले की, ज्यायोगे पुन:पुन्हा मरण्याची पाळी येऊ नये. येथे कबीराने आध्यात्मिक मृत्यू आणि सामान्य मृत्यू यांमधील फरक सांगितला आहे. पहिल्या प्रकारच्या मृत्यूचा अर्थ आहे जिवंतपणी मरण. जो असे मरण (अत्यंत विरक्त होणे) अनुभवतो तो जरामरणापासून मुक्त होतो.

४९) कबीर म्हणतो, जेव्हा माझे मन गंगाजलाप्रमाणे निर्मळ होऊन गेले तेव्हा स्वत: ईश्वर 'कबीर', 'कबीर' असे म्हणत माझ्यामागे हिंडू लागला. अर्थात, मन निर्विकार

झाल्यावर केवळ परमात्माच प्राप्त होतो असे नव्हे, तर तो भक्ताचा सर्व भार वाहू लागतो. - या अद्भुत दशेचे वर्णन कबीराने आपल्या फक्कड पद्धतीने केलेले आहे.

५०) जगण्यापेक्षा मरणे चांगले. पण, मरणे म्हणजे काय ते कोणी जाणत असेल तेव्हा! (शरीराच्या) मृत्यूपूर्वीच जो आपले मन निर्विकार करतो, जीवन्मृत होतो, तोच या कलियुगात अजरामर होऊन जाईल.

५१) कबीर म्हणतो, हळद पिवळी असते आणि चुना पांढरा असतो. परंतु रामाचे भक्त प्रेमाच्या लाल रंगात असे काही एकरूप झाले की, दोन्ही रंग नष्ट झाले. हळद आणि चुना येथे दोन परस्परविरोधी रंगांचे सूचक आहेत. पण दोन्ही एकत्र केल्यावर लाल रंग तयार होतो. त्यात दोन्ही रंग असतात. परंतु ते वेगळे न दिसता, एकच दिसतात. साहित्यामध्ये लाल रंग प्रेमाचे प्रतीक मानले जाते. म्हणून या साखीतील 'स्नेही' शब्द विशेष ध्यानात घेण्यासारखा आहे. कथनाचा सारांश असा आहे की, रामभक्त या पक्षाचाही असत नाही किंवा त्याही पक्षाचा असत नाही. तो मध्यममार्गी असतो. त्यात दोन्ही पक्ष आपापले भेद दूर सारून एकत्र असतात. दुसरा अर्थ –ज्याप्रमाणे लाल रंगच पिवळा आणि पांढरा रंग आपल्यात सामावून घेत असतो, त्याचप्रमाणे प्रेम हेच दोन विरोधी मतांना एकत्र आणू शकते.

५२) जो चाकोरीत राहून जगतो तो सामान्य माणूस होय. जो रूढिबंधने झुगारून चाकोरीबाहेरचे जिणे जगतो तो साधू होय. पण जो चाकोरीतील आणि चाकोरीबाहेरील दोन्ही प्रकारचे जीवन सोडून देतो त्याचेच मत खरे 'अगाध' असते (व्यापक असते).

५३) हिंदू 'राम राम' म्हणत मेले. मुसलमान 'खुदा खुदा' म्हणत मेले. कबीर म्हणतो, दोन्हीच्या जवळसुद्धा फिरकला नाही तो खरा शहाणा माणूस होय.
जे हिंदू केवळ रामालाच परमात्मा मानून खुदाला विरोध करतात, अथवा जे मुसलमानही, केवळ खुदालाच मानून रामाला विरोध करतात, अशा असमंजस लोकांना उद्देशून कबीरदास बोलत आहेत.

५४) काबाच बदलून काशी बनला. राम रहीम झाला. जाडेभरडे पीठ दळून मऊ मैदा झाले, कबीर बसून ते मळतो आहे!

५५) अरे शेख (मुसलमान धर्मगुरू), संतोषाशिवाय हाजची यात्रा करण्यासाठी काब्याला काय जातो आहेस? ज्याचे मन निकोप नाही त्याला देव कोठून मिळणार?

५६) काशीजवळ घर बांधावे आणि गंगेचे पवित्र पाणी प्यावे, पण भगवंताच्या नामस्मरणाशिवाय मुक्ती लाभणार नाही, असे कबीरदास सांगतात. (लोक मानतात त्याप्रमाणे केवळ काशीमध्ये राहिल्याने मुक्ती प्राप्त नाही. परमेश्वराच्या नामस्मरणावर श्रद्धा ठेवली तरच ती मिळते.)

५७) स्वामीसंगे (परमात्म्याशी) प्रामाणिकपणे आचरण करा. इतरांशी शुद्ध भावाने अथवा सरळपणे वागा. - मग तुम्ही केसाच्या जटा वाढवा. हवेतर सारे केस चक्क काढून तुळतुळीत गोटा करा. (अर्थात बाह्य वेशभूषा कशीही असे, मन शुद्ध असले म्हणजे झाले.)

५८) साधू झाला आणि गळयात चार माळा अडकविल्या म्हणून तेवढ्याने भागले काय? बाहेरच्या बाजूस तर शेंदूर रंगवून लाल लाल चमकदार करून टाकले आणि आत मात्र केरकचरा भरला आहे! अर्थात, बाह्य वेशभूषा तर छान जमली पण आत मनात मात्र वासनांचा कचरा साठला आहे.

५९) केसांनी असे काय पाप केले आहे. म्हणून त्यांना शंभर वेळा वळवीत बसतोस? ज्यात विषयवासना भरलेल्या आहेत, त्या मनालाच का बरे वळवीत नाहीस?

६०) तीच अक्षरे (शब्द), आणि तीच वाक्ये (असतात), पण प्रत्येक माणूस ती वेगवेगळ्या पद्धतीने उच्चारित असतो. कोणी एखादा त्यात मृदुता (सौंदर्य) मिसळतो तेव्हा तेच (बोलणे) अमृतमय होऊन जाते.

६१) पाण्याहूनही पातळ, धुरापेक्षाही पोकळ, आणि वेगाच्या बाबतीत वाऱ्यापेक्षाही अधिक वेगवान अशा 'परब्रह्मा'स कबीराने आपला मित्र बनवून टाकले आहे.

६२) कबीर म्हणतो, भिक्षा मोठी चांगली असते, कारण त्यात नाना प्रकारचे पदार्थ तरी खायला मिळतात! शिवाय येथे कोणा एकाचा हक्कही असत नाही. परदेशापेक्षा हे मोठे राज्य आहे!

६३) चिंता सोडून देऊन निश्चिंत व्हा. स्वामी समर्थ आहे! पशु-पक्षी आणि जीव-जंतू यांच्यापाशी असे कोणते मोठे भांडवल आहे? (सारांश, तो समर्थ ईश्वर ज्यांच्यापाशी काहीही नाही त्यांचेही जर रक्षण करतो, तर मग तुझे का बरे करणार नाही?)

६४) रामनामाशी मन एकरूप झाले आहे. यामुळे माझ्या आणि यमाच्या मध्ये खोल दरी निर्माण झाली आहे. मला माझ्या आराध्य देवाचा भरवसा आहे – हा सेवक नरकात नाही जाणार.

६५) गाण्यातच रडणे दडलेले असते; आणि रडण्यातच गाणे. – अशाच पद्धतीने कोणी विरागी साधनसंपत्ती जमवितो; कोणी गृहस्थ विरागात सुख मानतो.

६६) कबीर म्हणतो, वाचन बंद करा. पुस्तके फेकून द्या. वर्णमालेतील बावन्न अक्षरे शोधा आणि 'र' आणि 'म' कारामध्ये चित्त एकाग्र करा. ('राम' शब्दाखेरीज बाकी सारे अध्ययन व्यर्थ होय.)

६७) हळूहळू सारे निघून गेले. मुलगा गेला, धन गेले, स्त्री (पत्नी) गेली आणि कामभावही नष्ट झाला; अर्थात, सर्व वासना विरून गेल्या. आता तर कबीरदास रामाशी 'एकमेक' (समरूप) होऊन भेटतो आहे. –जितके म्हणून आकर्षण या जगातील वस्तूंविषयी होते तेवढे त्याच्यातून निघून गेले आणि ते रामाविषयी होऊन बसले. यामुळे राम आणि भक्त यांत फरकच राहिला नाही.

तुलसीदासानेही म्हटले आहे --

**कामिहि नारि पियारि जिमि, लोळिहिं प्रिय जिभि दाम ।**
**तिमि रघुनाथ निरंतर प्रिय लागहु मोहि राम। ।**

कामी पुरुषास ज्याप्रमाणे स्त्री प्रिय असते, लोभी माणसास जसे धन प्रिय असते, त्याप्रमाणे माझ्या मनी रघुनाथाविषयी निरंतर प्रीतिभाव निर्माण होवो.

कबीरदास आणि तुलसीदास या दोहोंनी 'सहज प्रवृत्ति' चे जे हे प्रतिपादन आवर्जून केले आहे, त्याचा विशेष विचार करायला हवा. भक्तीचे वास्तविक रहस्य हेच आहे. "रामाचरितमानसा"चा हा शेवटचा दोहा आहे. यावरून तुलसीदासांचा सहज मार्गाकडे किती ओढा होता ते स्पष्ट दिसून येते. कबीरांचा भक्तिमार्गही असाच आहे. यात सर्व प्रापंचिक वासना हळूहळू नष्ट होतात आणि 'रामा'साठी जागा करून देतात – !

Lasertypeset at Mac Script, Pune-411007
and printed at Tarang Printers. Delhi-110092